*राष्ट्रीय चरित्रमाला*

# मानवेंद्रनाथ रॉय

व.भ. कर्णिक

अनुवाद

द्वा. भ. कर्णिक




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# प्रस्तावना

एम्. एन्. रॉय हे एक अपूर्व व्यक्तिमत्व होते. या शतकाच्या पहिल्या दोन दशकात या देशात जे सशस्त्र संघर्ष झाले, त्यात प्रत्यक्षपणे भाग घेण्याचा योग त्यांना प्राप्त झालेला होता. पुढील काही वर्षात मेक्सिको आणि चीन या देशात जे क्रांतिकारक संघर्ष झाले, त्यातही प्रत्यक्षपणे भाग घेण्याची पाळी त्यांच्यावर आली होती. लेनिन, ट्रॉट्स्की आणि स्तालिन यांसारख्या जागतिक क्रांतिकारक नेत्यांच्या खांद्याला खांदा लावून उभे राहण्याचा दुर्मिळ योग त्यांच्या जीवनात आला होता. राष्ट्रीय क्षेत्रातील कोणत्याही त्यांच्या समकालीनाला असे डोळे दिपवणारे भाग्य लाभले नसेल. एक महात्मा गांधी वगळले तर त्या सर्वांनी फक्त भारतातच कार्य केले आणि नेहरू सोडता त्यांच्यापैकी कोणाचेही आंतरराष्ट्रीय संबंध नव्हते. नेहरूंनाही इतर देशातील क्रांतिकारक आंदोलनांचा रॉय यांच्याइतका अनुभव मिळाला नाही.

तरीही 1936 सालच्या डिसेंबरनंतर रॉय हे राष्ट्रीय आंदोलनात उघडपणे भाग घेऊ लागल्यानंतर त्यांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे मान्यता आणि यश मिळाले नाही किंवा आपल्या व्यक्तित्वाचा चिरकालीन ठसा त्यांना राष्ट्रीव आंदोलनावर उमटविता आला नाही. त्यानंतर उण्यापुऱ्या चार वर्षाच्या आतच राष्ट्रीय आंदोलनाचे मुख्य साधन असलेल्या इंडियन नॅशनल काँग्रेसचा त्यांना त्याग करावा लागून भारतातील सामान्य लोकांच्या मागण्या आणि आकांक्षांना वाचा फोडण्यासाठी आणि त्या संपादन करण्याकरिता लढा देण्यासाठी एक नवी संघटना उभी करण्याचे कार्य त्यांना सुरू करावे लागले. ही घटना दुसरे जागतिक युध्द सुरू झाल्यानंतर घडली. रॉय यांनी धैर्याने आणि निर्धाराने या युध्दाला बिनशर्त पाठिंबा दिला. तर काँग्रेसने प्रथम द्विधा मन:स्थिती प्रगट करीत अखेरीस 'छोडो भारत' आंदोलनाच्या स्वरूपात युध्दाला प्रतिकार करण्याची भूमिका घेतली. काँग्रेसचे धोरण लोकप्रिय ठरले कारण त्यातून जनतेच्या ब्रिटिश-विरोधी भावनांना वाचा फोडली जात होती. पण रॉय यांच्या दूरदृष्टीसमोर भावी काळच्या घटनांचे अधिक स्पष्ट चित्र तरळत होते. त्यांना दिसत होते की हिटलर आणि त्याचे साथीदार यांचा विजय झाला तर साऱ्या जगातील लोकांना गुलामगिरीकडे ते खेचून नेतील. याच्याउलट ब्रिटन आणि इतर फॅसिस्ट-विरोधी शक्तींचा विजय झाला, तर त्यातून साम्राज्यांचे

विघटीकरण होईल आणि भारत व इतर वसाहती यांच्या स्वातंत्र्याचा मार्ग मोकळा होईल. रॉय यांचे भाकित खरे ठरले. पण ते स्वतः सन्मानहीन प्रेषितच राहिले.

रॉय यांचे काँग्रेस,विशेषतः काँग्रेसचे गांधीवादी नेतृत्व यांच्याशी जे मतभेद झाले, त्याची सुरूवात काही दुसऱ्या महायुध्दापासूनच झाली नाही. ते मतभेद बरेच जुने होते. 1920 सालच्या असहकारितेच्या आंदोलनाच्या वेळेपासून ते सुरू झाले आणि भारतामधे कम्युनिस्ट पक्ष विकसित करण्यासाठी रॉय यानी जेव्हा हिरीरीने खटपट सुरू केली तेव्हा ते वाढीस लागले. जन आंदोलनाचे संघटक म्हणून रॉय याना गांधीजींबद्दल मोठा आदर असे. पण त्यांचे असे मत होते की गांधीजींचा कार्यक्रम नकारात्मक आणि निरूपद्रवी असून त्यांचा सामाजिक दृष्टिकोन प्रतिगामी आहे. असा कार्यक्रम आणि दृष्टीकोन् ठेवून गांधीवादी नेतृत्वाला राष्ट्रीय क्रांतीच्या रोखाने जनतेला कदापिही नेता येणार नाही अशी रॉय यांची बालंबाल खात्री होती. रॉय यांची क्रांतीबद्दल जी कल्पना होती, तीत राजकीय स्वातंत्र्याबरोबर सामाजिक आणि आर्थिक स्वातंत्र्याचाही समावेश होत असे. म्हणून परदेशात असताना आणि कारावासातून मुक्तता झाल्यानंतर जेव्हा 1936 साली त्यांनी काँग्रेसमधे प्रवेश केला, तेव्हाही त्यांनी जुन्या नेतृत्वाच्या जागी नवे नेतृत्व निर्माण करायचाच सतत प्रयत्न केला. या नव्या नेतृत्वाने राजकीय सामाजिक, आर्थिक आणि तत्वज्ञानात्मक अशा सर्वांगीण क्रांतीचा स्पष्ट, काटेकोर कार्यक्रम द्यावा ही रॉय यांची अपेक्षा होती. त्या दृष्टीने त्यांनी गांधीजींना सडेतोड विरोध करण्याचे व्रत स्वीकारले. साहजिकच ते अपयशी होणे क्रमप्राप्त होते आणि प्रचंड बौध्दिक बळ, संघटना कौशल्य आणि कष्ट सोसण्याची व त्याग करण्याची तयारी असूनही त्यांना अपयश हे आलेच.

रॉय यांनी गांधीना विरोध केला तो एक व्यक्ती म्हणून नव्हे तर जनतेच्या खऱ्याखुऱ्या हितसंबंधांना विरोधी असे होऊ शकणाऱ्या विचारपरंपरेने व जीवन पध्दतीचे ते प्रतिनिधी आहेत असे त्यांना वाटले म्हणून. रॉय यांचा दृष्टिकोन पूर्णपणे आधुनिक, तर्कशुध्द आणि शास्त्रशुध्द होता. गांधीजी हे मध्ययुगीन आध्यात्मिक दृष्टिकोनाचे तर आहेतच पण आधुनिक संस्कृतीचे विरोधक आणि बड्या लोकांच्या आर्थिक हितसंबंधांचे संरक्षक आहेत; असेच रॉय यांना वाटत असे. रॉय हे लोकभ्रम आणि उपद्रवकारक सामाजिक रूढींच्या विरूध्द नेहमीच दंड थोपटून उभे राहात असत. राजकारण आणि सामाजिक व्यवहार यात होणाऱ्या धर्माच्या हस्तक्षेपाला त्यांचा विरोध असे. तत्वज्ञानात्मक क्रांतीचे ते कळकळीचे पुरस्कर्ते होते. त्यांना लोकांची विचारपध्दती बदलावयाची होती आणि ती अशासाठी की लोक चिकित्सक आणि स्वावलंबी व्हावेत. वीरपूजनाचा रॉय यांना तिटकारा असे. या सर्व गोष्टींमुळे रॉय हे

लोकांमध्ये आणि गांधीजींच्या अनुयायांमध्ये प्रिय झाले नाहीत आणि राजकीय नेता म्हणून यशस्वी होण्याच्या बाबतीत त्यांना बऱ्याच मर्यादा आणि अडथळे याना तोंड द्यावे लागले. अखेरच्या काळात ते जेव्हा रॅडिकल ह्यूमॅनिस्ट (जहाल मानवतावादी) झाले, तेव्हा त्यांचे विचार आणि गांधीजींचे विचार यांच्यामध्ये काही साम्यस्थळे आढळून आली. पण तोवर गांधीजी निधन पावले होते आणि रॉय दैनंदिन राजकारणातून निवृत्त झाले होते.

रॉय यांनी आपल्या राजकीय जीवनाची सुरूवात लढाऊ राष्ट्रवादी म्हणून केली. बॉंब आणि पिस्तुल यांचा उपयोग करणाऱ्या पंथावर त्यांचा विश्वास होता आणि सशस्त्र बंड करण्याचीही त्यांना आवश्यकता वाटत होती. त्या मार्गाचे वैफल्य कळून आल्यामुळे ते प्रथम समाजवादी आणि नंतर कम्युनिस्ट झाले. कम्युनिस्ट आंदोलनात ते उच्च पदावर चढले. या पदावर चढल्यामुळे त्यांच्या हाती बरीच सत्ता आली आणि त्यांना खूपच प्रतिष्ठाही मिळाली. त्यातून ही पदे टिकवून धरण्याचा कोणालाही मोह झाला असता. पण सबंध जगातील कम्युनिस्ट आंदोलनांचे नेतृत्व करणारे कम्युनिस्ट इंटरनॅशनल चुकीच्या मार्गाने जात आहे, हे आढळून येताच रॉय यांनी सारे मोहपाश झुगारून दिले. ते इंटरनॅशनल आणि त्याचा नेता स्तालिन यांच्याविरूध्द उभे ठाकले. त्यांना संघटनेतून बाहेर फेकण्यात आले आणि राजकीय दृष्टीने त्याना नामोहरम करण्यासाठी प्रचाराची सारी हत्यारे उपयोगात आणली गेली. त्यांच्यावर 'पाखंडी', 'क्रांतिविरोधक', 'साम्राज्यशाहीचा हस्तक' वगैरे शिव्यांचा भडिमार झाला. या खुनशी प्रकाराने त्यांचा अखेरपर्यंत पिच्छा सोडला नाही. त्यांचे निधन होईपर्यंत ते जेथे जेथे गेले, तेथे हा प्रकार घुमत राहिला.

जवळजवळ पंधरा वर्षांच्या कालावधीनंतर 1930 साली रॉय भारतात परत आले. मूठभर एकनिष्ठ सहकारी सोडले, तर रॉय हे एकटेच होते आणि त्यांच्याविरूध्द उभी ठाकली होती ती साम्राज्यशाहीची प्रबळ सत्ता. थोड्याच महिन्यांच्या आत त्याना तुरूंगात डांबण्यात आले. राष्ट्रीय आंदोलनाचा एक अविभाज्य घटक म्हणून कम्युनिस्ट आंदोलन संघटित करण्याचा प्रयत्न केल्याबद्दलचे प्रायश्चित्त त्यांना भोगावे लागले. तुरूंगातून सुटका होताच राष्ट्रवादी आंदोलनात त्यांनी स्वत:ला झोकून दिले. पण आंदोलनातील त्यांचा मार्ग निष्कंटक नव्हता; उजव्या आणि डाव्या गटांकडून त्यांना विरोध सहन करावा लागला आणि त्यानंतर दुसरे जागतिक युध्द पेटले. त्या युध्दाने राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय राजकारणातच नव्हे तर विचारांच्या जगातही नाट्यपूर्ण स्थित्यंतरे घडवून आणली.

युध्दकाळात आणि युध्दोत्तर काळात ज्या घडामोडी झाल्या त्यांनी कम्युनिझम आणि मार्क्सवाद यातील उणीवांचे रॉय यांना दर्शन घडवून आणले आणि वैचारिक दृष्टीने त्यांच्या पलीकडे गेले पाहिजे ही जाणीव रॉय यांच्या

मनात उमटली. ते रॅडिकल ह्यूमॅनिस्ट झाले आणि राष्ट्रवाद ते कम्युनिझम आणि कम्युनिझम ते जहाल मानवतावाद असा त्यांचा प्रवास परिपूर्ण झाला.हा प्रवास ''स्वातंत्र्याच्या शोधा''साठी सुरू झाला होता. स्वातंत्र्याबद्दलचा ध्यास रॉय यांनी विद्यार्थीदशेतच घेतला होता आणि त्या ध्यासापायी ते क्रांतिकारी आंदोलनात सामील झाले होते. त्याच ध्यासाने ते जगभर हिंडले आणि चीन, जपान, अमेरिका, मेक्सिको, रशिया आणि युरोपमधील इतर अनेक राष्ट्रांचा दौरा केल्यानंतर ते पुन्हा एकदा चीनमार्गे भारतात परत आले. या स्वैरसंचारात ते अनेक थोर व्यक्तींना भेटले आणि त्यांनी विविध विचारप्रणालींचा त्याचप्रमाणे आधुनिक भौतिक व रसायनशास्त्रांचा तसाच समाजशास्त्राचा व मनोविज्ञान शास्त्राचाही अभ्यास केला. या ज्ञानसंपन्नतेनंतर त्यानी स्वत:चे एक तत्वज्ञान विकसित केले - जहाल मानवतावादाचे तत्वज्ञान.

राजकीय कार्यकर्त्याने पंडित आणि विचारवंत होणे ही दुर्मिळच गोष्ट होय. रॉय दोन्हीही होते. त्यांनी जी ग्रंथसंपत्ती मागे ठेवली आहे त्यातूनच याची पुरेपूर प्रचिती येते. हे ग्रंथ अनेकविध विषयावरील आहेत. राजकारण आणि अर्थशास्त्र यापासून तत्वज्ञान आणि विज्ञान येथपर्यत त्यांची व्याप्ती आहे.

अशा अपूर्व व्यक्तीचे जीवनचरित्र हे झपाटून टाकणारे. होईल यात शंका नाही. या पुस्तकात त्यावर काहीसा प्रकाश पडू शकेल.

# अनुक्रमणिका

# जहाल राष्ट्रवादी

मानवेंद्रनाथ किंवा एम्.एन. रॉय हे- ज्यांचे जीवन चरित्र येथे कथन केले जात आहे, त्यांचे मूळ नाव नव्हे. हे नाव बऱ्याच वर्षानंतर धारण करण्यात आले. जेव्हा चरित्र नायकाला आपल्या जीवनाचा एक अंक संपवून नवा अंक सुरु करण्याची इच्छा झाली तेव्हा. मूळ नाव नरेंद्रनाथ भट्टाचार्य. जीवनाच्या पहिल्या कालखंडात त्यांचे जहाल राष्ट्रवादाच्या काळात रॉय आपल्या मूळ नावाने ओळखले जात.

नरेंद्रनाथ किंवा नरेन् किंवा नोरेन या नावाने त्यावेळी ओळखले जाणारे रॉय 1887 साली कलकत्त्यापासून फार दूर नसलेल्या चोवीस परगणा जिल्हातील अरबेलिया या गावी जन्मले.[1] ते एका पुजारी कुटुंबात जन्माला आले. त्यांचे वडील दीनबंधू भट्टाचार्य मिदनापूर जिल्हातील क्षेपुट या गावातील क्षेपुटेश्वरी देवतेच्या मंदिराचे मुख्य पुजारी होते. मुख्य पुजारीपण हे वंश परंपरागत चालत येत असे. दीनबंधू यांनी ते गाव सोडले आणि अरबेलिया या गावी संस्कृत शिक्षकाची नोकरी स्वीकारली. नरेंद्रनाथ हे त्यांचे चवथे चिरंजीव. पहिल्या पत्नीचे निधन झाल्यानंतर त्यांनी जे दुसरे लग्न केले, त्या पत्नीला झालेले दुसरे चिरंजीव. त्यानंतर दीनबंधू यानी त्याच जिल्ह्यातील, कलकत्त्यापासून दक्षिणेला बारा मैल दूर असलेल्या चिंग्रीपोटा या गावात वास्तव्य केले. चिंग्रीपोटा येथे त्यांनी काही मालमत्ता खरेदी केली आणि 1905 साली त्यांचे निधन होईपर्यंत ते तेथेच राहिले.

नरेंद्रनाथ चिंग्रीपोटा येथेच वाढले. त्यांचे शिक्षण तेथेच झाले आणि जहाल राष्ट्रवादी म्हणून त्यांनी जे कार्य केले त्या पहिल्या वहिल्या कार्याचा पायाही तेथेच घातला गेला. ज्या शाळेत त्यांनी शिक्षण घेतले त्या शाळेबद्दल किंवा शिक्षणात त्यांनी केलेल्या प्रगतीबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. तथापि, असे दिसते की ते प्रवेश परीक्षेत उत्तीर्ण झाले आणि कलकत्त्याच्या नॅशनल कॉलेजमधे त्यांनी स्वत:ला दाखल करून घेतले. त्यांच्या उच्च शिक्षणाचा अंत तेथेच झाला.

चिंग्रीपोटा हे नरेंद्रनाथांचे गाव, कोडालिया, हरनवी आणि राजपूर या गावांना लागूनच होते. या गावांचा मिळून एक समूह होता आणि त्या गटाने आधुनेक बंगालच्या सामाजिक व राजकीय विकासात फार मोठा वाटा उचललेला

आहे. समरेन रॉय त्याबद्दल लिहितात, ''एकोणिसाव्या शतकातील बंगालमधील बऱ्याच धार्मिक व सामाजिक सुधारकांनी येथे जन्म घेतला. त्यातील नामवंत म्हणजे राजनारायण बोस (अरविंद आणि बारींद्र घोष यांच्या आईचे वडील) द्वारकानाथ विद्याभूषण 'सोमप्रकाशचे'विख्यात संपादक आणि पंडित शिवनाथ शास्त्री यांचे सहकारी होत. एकोणिसाव्या शतकातील महापंडित शिवनाथ शास्त्री यांनी 'ब्राम्होवाद' हा नवा पंथ स्वीकारण्यासाठी आपले पवित्र जानवे तोडून टाकले. नरेनच्या आईचे ते मामा होते आणि कुटुंबातील तरूण पिढीवर त्यांचा प्रभाव पडलेला दिसून आल्याशिवाय राहिला नाही. राजनारायण बोस आणि शिवनाथ शास्त्री यांनी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस एक गुप्त क्रांतिकारक गट स्थापन करण्याचा पहिला प्रयत्न केला होता आणि नवगोपाळ मित्र यांच्या 'जातीय मेला'[2] या पुस्तकालाही त्यांनी स्फूर्ती दिली होती.'' येथेच नरेंद्रनाथ यांचा हरिकुमार चक्रवर्ती यांच्याशी संबंध जडला, आणि ते त्यांचे जीवनभराचे मित्र आणि त्यांच्या संबंध जीवनातील सामाजिक व राजकीय चळवळीतील जिव्हाळ्याचे सहकारी बनले.

पूर्वायुष्यात नरेंद्रनाथ यांनी आपले वडील, वडील बंधू आणि इतर यांच्याकडून संस्कृतचे बरेचसे शिक्षण घेतले असावे. तत्वज्ञान आणि तर्कशास्त्र यावरील बरेचसे ग्रंथही त्यांनी वाचले असणे शक्य आहे. पुढील आयुष्यात अधून मधून ते त्यातील वचने म्हणून दाखवीत असत. मध्ययुगीन बंगालचे विख्यात तार्किक रघुनंदन यांचे वंशज असल्याचे ते अभिमानाने सांगत असत.

नरेंद्रनाथ यांच्या बालपणी बंगाल राजकीय वावटळीतून जात होता. त्या वावटळीने कळस गाठला तो बंगालच्या फाळणीविरूद्ध पुकारण्यात आलेल्या संघर्षाच्या वेळी. ही फाळणी 1905 साली झाली. पण तिच्याविरूद्ध असंतोषाचे सूर आधीपासूनच निघू लागले होते. खरे सांगावयाचे तर फाळणी हे राजकीय असंतोषाला ब्रिटिश सरकारने दिलेले कल्पनादरिद्री उत्तर होते. असंतोषाची वावटळ, आपण अस्थिर प्रदेशाची फाळणी करून आटोक्यात ठेवू अशी ब्रिटिश सरकारची आशा होती. पण झाले ते उलटेच, ही वावटळ वाढत गेली. तीव्रतर झाली आणि अखेरीस सरकारला फाळणी रद्द करावी लागली. स्वातंत्र्याबद्दलची आकांक्षा जागृत झाल्यानंतर ती दडपून टाकणे शक्यच नव्हते. ही आकांक्षा वाढत गेली आणि त्यातून आधिष्ठित सत्तेविरूद्ध एकामागून एक आघात करण्याची तरूणांना स्फूर्ती मिळाली.

असंतोषाचा हा उद्रेक देशभर प्रगट झाला. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या काळात त्या असंतोषाने मूळ धरले. अर्जविनंत्या आणि सनदशीर चळवळ यांच्या राजकारणातून फारसे काही निष्पन्न न झाल्यामुळे निर्माण झालेले वैफल्य, जनतेचे वाढते दारिद्रय आणि सुशिक्षित तरूणांमधील बेकारी

आणि राष्ट्र व त्याचा धर्म याबद्दलच्या श्रद्धेचे पुनरूज्जजीवन ही या असंतोषामागील काही प्रमुख कारणे होती. श्रद्धेच्या पुनरूज्जीवनातून धार्मिक राष्ट्रवादाला जी चालना दिली गेली, त्यातून एक प्रबल शक्ती निर्माण झाली आणि मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी क्रांतिकारक कार्यात स्वतःला झोकून देण्याची बऱ्याच शूर तरूणांना प्रेरणा देण्यास ती शक्ती कारणीभूत झाली. बंकिमचंद्र चटर्जी यांनी 'आनंद मठ' या सुप्रसिद्ध कादंबरीत मातृभूमीची कल्पना जी मांडली, तिने या तरूणांची मने भारून टाकली आणि 'वंदे मातरम्' हा त्यांचा युद्धघोष झाला. त्यांना वाटू लागले आपण कादंबरीतील संन्यासी (तपस्वी) व्हावे आणि मातेच्या मुक्ततेचे कार्य करण्यासाठी स्वतःला वाहून घ्यावे. त्यांच्या विचारांना व कृतीला प्रेरणा देणारी दुसरी महत्वाची व्यक्ती म्हणजे स्वामी विवेकानंद हे होत. अमेरिकेतून विजयी होऊन परत आल्यानंतर ते पुनरूज्जीवित आध्यात्मिक स्वरूपातील धार्मिक राष्ट्रवादाचे प्रभावी प्रवक्ते झाले.

बंगाल प्रांतामध्ये नजिकच्या खेडयापाडयात जहाल राष्ट्रवादाचे जे वातावरण निर्माण झाले, त्याचा प्रभाव पडून तरूण नरेंद्रनाथ सहजपणे क्रांतिकारक आंदोलनाकडे आकर्षिले गेले. त्यांनी या आंदोलनात प्रत्यक्षपणे केव्हा उडी घेतली हे सांगणे कठीण आहे. पण केव्हातरी 1904 साली ते या चळवळीत सामील झाले असावेत. त्यावेळचे त्यांचे एक जिव्हाळ्याचे सहकारी जदुगोपाळ मुकर्जी, समरेन रॉय यांच्या 'द रेस्टलेस ब्रॅम्हिन' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हणतात :

''मी प्रथम नरेन भट्टाचार्य यांना 1905 किंवा 1906 साली अनुशीलन समितीत भेटलो. अनुशीलन समितीच्या 49 कॉर्नवॉलिस स्ट्रीटवरील कचेरीत कार्यकर्त्यांच्या राहण्याची व्यवस्था करण्यात आलेली असे आणि नरेन् अनेकवेळा तेथे राहात असे. ते आणि हरिकुमार चक्रवर्ती हे समितीचे बरोबरच सभासद झाले.''[3] हरिकुमार चक्रवर्ती यांच्या म्हणण्याप्रमाणे हे तिघे मित्र (नरेंद्रनाथ, हरिकुमार आणि सैलेश्वर) 1904 साली कलकत्त्यात गेले. बारींद्र घोष आणि त्यांचे बंधू अरविंद घोष, (जे पुढे युगांतरचे संपादक झाले) यांची त्यांनी भेट घेतली आणि क्रांतिकारक चळवळीत सामील होण्याचा त्यांनी निर्णय घेतला. बहुधा पुढील वर्षाच्या सुमारास त्यांनी जदुगोपाळ मुकर्जी यांची भेट घेतली असावी.

त्यापूर्वीच्या कालखंडाबद्दल हरिकुमार चक्रवर्ती, जे नरेंद्रनाथ यांना 1899 सालीच प्रथम भेटले आणि तेव्हांपासून त्यांची मैत्री आणि सहकार्य चालू राहिले, लिहितात : ''तरूण नरेन हा साहसप्रिय होता. दूरवरून चालत येण्याची आणि रानावनात हिंडण्याची, आणि त्या स्वैरसंचारात कोठल्या तरी अज्ञाताचा शोध घेण्याची, सर्वकाळ विचार मग्न राहण्याची त्याला आवड

असे. भुताखेतांच्या दर्शनासाठी तो बऱ्याच रात्री स्मशानात काढीत असे.''[4] नरेंद्रनाथ हा त्यावेळी एक अस्वस्थ आत्माच असे. ते वडिलांबरोबर संस्कृत शिकत असत. बेलूरच्या रामकृष्ण मठाला भेट देत असत, शिवनारायण स्वामी यांच्याकडून लाठी आणि योग आणि राष्ट्रवाद व सुधारित हिंदुधर्म यांच्याबद्दलचे धडे घेत असत आणि क्रांतिकारक व त्यांच्या हालचाली यांच्याबद्दल माहितीही गोळा करीत असत.

नरेंद्रनाथनी आंदोलनात प्रवेश केला त्याबद्दल त्यावेळच्या त्यांच्या एका सहकाऱ्याने खालीलप्रमाणे वर्णन केले आहे. ''नरेंद्र हा एक मुलगाच होता. चौदा वय असेल त्याचे पण बांध्याने मजबूत आणि उत्साहाने फुललेला. क्रांतीच्या उत्साहाने भारून गेलेला. एका लहानशा खोलीत आम्ही बंगाल आणि इतरत्रच्या प्रश्नांबद्दल अनौपचारिक चर्चा करीत असतानाच नरेंद्र झपाटयाने आत आला. त्याचे आणि आमचे काही बोलणे झाले आणि त्यानंतर लगेच त्याने परदेशी जोखडाखालून भारताला मुक्त करण्याच्या कार्यात पूर्णवेळ काम करण्याची आपली इच्छा प्रगट केली. त्याने शपथेवर जाहीर केले की आपण अशक्य ते करावयाला तयार आहोत. कारण क्रांतिकारकाला अशक्य असे काही नसतेच. त्यानंतर थोडयाच काळात तो आम्हाला येऊन मिळाला; आमच्या आंदोलनाच्या दृष्टीने तो फार उपयुक्त ठरला. आणि लोकनायकाच्या ठायी दिसणाऱ्या दुर्मिळ गुणांचा त्याच्याकडून आम्हाला प्रत्यय आला.''[5]

स्वातंत्र्याच्या ध्येयानेच नरेंद्रनाथ क्रांतिकारक आंदोलनाकडे वळले. 1905 साली नरेंद्रनाथ आपले दोन मित्र, हरिकुमार चक्रवर्ती व सैलेश्वर बोस यांच्या बरोबर कलकत्ता येथे वारंवार भरणाऱ्या फाळणी-विरोधी सभांना हजर राहात असत. एकदा त्या तीन मित्रांनी विख्यात राष्ट्रवादी पुढारी सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांना कोडालिया येथे बोलाविले व त्यांच्यासाठी एक सभा बोलावली. त्या राजकीय चळवळीसाठी त्यांना व इतर दोघांना शाळेमधून काढून टाकण्यात आले; पुढे तो हुकुम रद्द करण्यात आला आणि प्रवेश परीक्षेला बसण्याची त्यांना परवानगी देण्यात आली. नरेंद्र आणि त्यांचे मित्र हे 'भगवद्गीता', बंकिम चतर्जी यांची 'आनंदमठ', अरविंद घोष यांची 'भवानी मंदिर', आणि त्या काळातील इतर क्रांतिकारक साहित्यांचे मोठ्या उत्साहाने वाचन करीत असत. पण त्यांच्यावर गाढा प्रभाव जर कोणी केला असेल तर स्वामी विवेकानंद यांच्या ग्रंथांनी.

नरेंद्रनाथ आणि त्यांच्या मित्रांनी नंतर अनुशीलन समितीत प्रवेश केला. 1902 साली ही समिती बंगाली युवकांच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक पुनरूत्थानासाठी स्थापन करण्यात आली. थोड्याच काळात त्या समितीत एक अंतर्गत किंवा भूमिगत शाखा विकसित झाली आणि संबध बंगालमधील

क्रांतिकारक चळवळींचे ते केंद्र बनले. काळांतराने अशाच तऱ्हेच्या संस्था अनेक शहरात स्थापन करण्यात आला. काही शाखा म्हणून तर काही स्वतंत्र केंद्रे म्हणून. त्यापैकी सर्वात महत्वाचे केंद्र ढाक्याची अनुशीलन समिती ही होय. या समित्यांमध्ये धोरण आणि डावपेच यांच्या बाबतीत नेहमीच एकमत होत नसे; व्यक्तिगत भांडणे, हेवेदावे आणि परस्परांबद्दलचे संशयही प्रगट होत असत. काही प्रसंगी मात्र त्या समित्या एकत्र येऊन समान चळवळी संघटित करीत असत. प्रत्येक समिती एक नेत्याच्या नियंत्रणाखाली असे. प्रवेशाच्या बाबतीत कठोर नियमांचे पालन केले जात असे, कडक शिस्त पाळली जात असे आणि कृतींच्या बाबतीतील गुप्तता राखण्यासाठी परिणामकारक उपाय केले जात असत. सरकार आणि पोलिस हे समित्यांच्या बाबतीत नेहमीच संशयी असत. पण त्यांच्याविरूद्ध त्यांना उपाय योजना मात्र करता येत नसे. कारण एकतर त्यांच्या उघडपणे दिसणाऱ्या कृती कायद्याच्या कक्षेत घडून येत असल्यासारख्या दिसत असत आणि दुसरे सी.आर.दास यांच्यासारख्या प्रमुख सार्वजनिक नेत्यांचा या समित्यांशी घनिष्ठ संबंध असे. 1908 सालाच्या सुमारास मात्र राजकीय दरोडे आणि खून यांच्याशी समित्याना जोडू शकणारा पुरेसा पुरावा त्यांच्या ताब्यात आला. हा पुरावा बऱ्याच धाडी घालून व शोधाचे जाळे पसरून त्यांनी हस्तगत केला आणि मग पोलिसांनी त्यांच्या विरूद्ध उपाय योजना करून या संघटना बेकायदेशीर ठरविल्या. कलकत्त्याची अनुशीलन समिती 1908 सालीच बेकायदा म्हणून जाहीर करण्यात आली. पुढच्याच वर्षी ढाक्का समितीची पाळी आली. त्यांच्या जोडीला इतर बऱ्याच समित्या बेकायदा ठरविण्यात आल्या.

शिस्तीचा आणि धोरणाचा एक भाग म्हणून समित्यांच्या नव्या सभासदांना समाजकार्य तसेच मदत कार्य करावे लागत असे. नरेन आणि हरिकुमार यांना दुष्काळी मदत कामासाठी उडीसामधे पाठविण्यात आले. नरेन् यांना जयपूरमधील रूरियाहाट कँप चालविण्याचे काम देण्यात आले. दोघांचेही काम समाधानकारक ठरले आणि कलकत्ता येथे येताच त्यांना अंतवर्तुळात सामील करून घेण्यात आले. तोवर नरेन् यांनी आपले घर सोडले होते व ते 49 कॉर्नवालिस स्ट्रीटवरील अनुशीलन समितीच्या मुख्य केंद्रात राहावयाला लागले होते. या सुमारास ते बारींद्र घोष यांच्या निकट आले होते. बारींद्र घोष यांनी 'युगांतर' हे बंगाली दैनिक आधीच सुरू केले होते. या दैनिकांची व्यवस्था पाहण्याच्या कामी नरेन् यांनी बारींद्र घोष यांना मदत केली आणि या वृत्तपत्रासाठी काही लेखही त्यांनी लिहिले. त्यानंतर त्यांनी 'मायेर डाक' (मातेची हाक) या नावाची एक बंगाली पुस्तिकाही लिहिली. ती पोलिसांच्या हाती पडली आणि त्यानंतर त्यांना पकडण्यात आले.

क्रांतिकारक आंदोलनात सामील झाल्यानंतर नरेनला पिस्तूल चालविणे आणि बॉंब तयार करणे, यांचेही शिक्षण देण्यात आले. क्रांतिकारकांची मुख्य साधने गोळ्या आणि बॉंब हीच होती. ब्रिटिश अधिकाऱ्यांना दहशत बसविण्यासाठी, समितीतील आणि भारतातील फुटिरांना शासन करण्यासाठी, जनतेत जागृती आणि उत्साह निर्माण करण्यासाठी आणि सशस्त्र बंड व मातृभूमीचे स्वातंत्र्य यांच्यासाठी या साधनांचा उपयोग केला जावयाचा होता.

याच सुमारास नरेन यांचा जतींद्रनाथ मुखर्जी यांच्याशी संबंध जडला. ते एक सरकारी नोकर होते. आणि बंगाल सरकारच्या अर्थखात्यात ते एक कारकून म्हणून काम करीत होते. तथापि क्रांतिकारक चळवळीत ते बरेच खोलवर रूजले होते. ते स्वभावाने फार प्रेमळ होते. आणि त्यांचे व्यक्तित्व मोठे आकर्षक होते. त्यांनी आपल्याभोवती तरूण क्रांतिकारकांचा एक संच जमविला होता. नरेन् यांनी त्यांना आपला नेता म्हणून स्वीकारले आणि पुढील काही वर्षात त्या दोघांनी बऱ्याच क्रांतिकारक साहसात एकत्र काम केले.

नरेन् हे बारींद्र घोष यांच्या बॉंब तयार करण्याच्या कार्यात आधीच सहभागी झाले होते. या कार्याचे केंद्र कलकत्त्याच्या उपनगरातील माणिकतोला विभागातील मुरारीपुकूर उद्यानात होते. त्या केंद्रात तयार झालेले बॉंब कलकत्त्यातील बऱ्याच ठिकाणी वापरण्यात आले. मुझफ्फरपूर येथे जो बॉंब 30 एप्रिल 1908 रोजी खुदीराम बोस यांनी वापरला त्याचे धागेदारे या केंद्राशी जुळविण्यात आले. त्या केंद्रावर छापा घालून त्याची झडती घेण्यात आली आणि तेथे सापडलेल्या साहित्याच्या आधारे एक कटाचा खटला भरण्यात आला. हाच अलिपूर कटाचा खटला म्हणून ओळखला जातो. या खटल्यात बारींद्र घोष व अरविंद घोष हे मुख्य आरोपी होते. नरेन्चा या खटल्याशी संबंध जोडण्यात आला नाही. पण पोलीसांना त्याच्याबद्दल संशय मात्र वाटला होता.

त्यापूर्वी एक वर्षभर आधी नरेन् याने त्या प्रांतातील पहिला राजकीय दरोडा घातला होता. जतीन मुखर्जी यांच्या नेतृत्वाखाली ज्या क्रांतिकारक चळवळी विकसित झाल्या होत्या, त्यांच्या मदतीसाठी द्रव्य उभारण्याकरिता हा दरोडा घालण्यात आला होता. डिसेंबर 1907 रोजी चिंग्रीपोटा रेल्वे स्थानकावर हा दरोडा घालण्यात आला.

स्टेशन मास्टरवर हल्ला करण्यात आला आणि त्याच्या कचेरीतील तिजोरीमधून पैसे काढून घेण्यात आले. नरेन् हा दरोड्यानंतर फरारी झाला. पण काही दिवसानंतर त्याला पकडण्यात आले. त्याला अटक होत असतांना बारींद्र घोष यांच्या 'वर्तमान रणनीती' (आधुनिक युध्दशास्त्राचे तंत्र) या पुस्तकाची एक प्रत आणि 'मायेर डाक' या पुस्तिकेचे हस्तलिखित नरेन् याच्याजवळ

सापडले.नरेन् यास जामीनावर सोडण्यात आले. यावेळी आपल्या विभागात त्याने जे समाजकार्य केले होते त्याची कीर्ती त्याच्या उपयोगी पडली. कलकत्त्याच्या सीऑल्डा पोलिस मॅजिस्ट्रेटपुढे त्याचा जामीन अर्ज सादर करताना त्याचे वकील प्रमथनाथ मुखर्जी यांनी म्हटले, ''हा तरूण बंगाल टेक्निकल इन्स्टिट्यूटचा विद्यार्थी होता व नॅशनल कॉलेजच्या प्रवेश परीक्षेत तो उत्तीर्ण तर झालाच पण त्याला एक पदकही देण्यात आले.'' पुढील एक दोन वर्षात नरेन् याने अनेक राजकीय दरोडे घातले. पण त्यांच्याबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. एका दरोड्याबद्दल जी थोडीफार माहिती उपलब्ध झाली आहे ती चोवीस परगण्यातील डायमंड हार्बर जवळील नेत्रा येथील दरोड्याची होय. हा दरोडा 25 एप्रिल 1909 रोजी घालण्यात आला. या दरोड्यात सुमारे 2000 रुपये हस्तगत केल्यानंतर नरेन् याने घराच्या मालकाला असे सांगितल्याचे कळते: ''आम्ही फक्त ब्रिटिशांना घालविण्यासाठी ही रक्कम कर्जाऊ घेत आहोत.'' नरेन् यास या दरोड्याच्या संबंधात अटक करण्यात आली. त्याला जामीनावर मुक्त करण्यात आले आणि नंतर तो फरारी झाला. नेत्रा दरोड्याचा स्वतंत्र खटला चालविण्यात आला नाही. एक वर्षानंतर जो हावडा कटाचा सुरू करण्यात आला त्यातच नेत्रा दरोड्याचा समावेश केला गेला.

निर्वासित म्हणून राहात असताना नरेन् याने सारा काळ हावडा व शिवपूर येथेच काढला. अनुशीलन समितीवर तोवर बंदी घालण्यात आली होती; अरविंद घोष हे राजकारणातून निवृत्त झाले होते. बारींद्र घोष व इतर लोकांना दीर्घ कारावासाच्या सजा झाल्या होत्या. क्रांतिकारक आंदोलन त्या दृष्टीने विस्कळीत झाले होते. नरेन् याच्यावरच आता पांगलेल्या व्यक्तींना एकत्र आणण्याची, त्यांचा आत्मविश्वास पुन्हा प्रज्वलित करण्याची आणि त्यांच्या शक्ती पुन: संघटित करण्याची जबाबदारी पडली. त्याने जतीन मुखर्जी यांच्या नेतृत्वाखाली हे कार्य केले. संघटक म्हणून तो ठिकठिकाणी हिंडला, त्याने क्रियाशील कार्यकर्त्यांच्या भेटी घेतल्या. जतीन मुकर्जी यांनी त्याला स्फूर्ती दिली; एवढेच नव्हे, तर एकवटीचे केंद्र म्हणून त्याचा उपयोग होऊ लागला. नरेन् याच्या चिंग्रीपोटा येथील गटाने या कार्यातील फार मोठा वाटा उचलला. हावडा येथे असताना नरेन् याने निरनिराळ्या गटांशी विचारविनिमय केला. आता ब्रिटिशांना या देशातून हाकलून लावण्यासाठी तो गनिमी कावा लढविण्याची आणि अशाच इतर उपाययोजना करण्याची आखणी करू लागला.

समरेन रॉय यांनी नरेन् यांच्या त्यावेळच्या सहकाऱ्यांच्या मुलाखती घेऊन जी माहिती गोळा केली त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते आणि ती

ही की नरेन् याचे विचार इतरांच्या मानाने खूपच पुढे गेलेले होते. त्याची विचारसरणी समाजवादाकडे झुकू लागली होती आणि राजकारणात धर्माचे प्राबल्य माजविण्याला त्याचा विरोध होता. ब्रिटिश सरकारच्या जागी कोणत्या प्रकारचे सरकार आणावे, याबद्दल नरेन् बोलत असे. त्याच्या मन:चक्षूंसमोर 'जनतेचे सरकार' तरळत असे. मूठभर लब्धप्रतिष्ठितांच्या सरकारपेक्षा अगदीच वेगळे असे रॉय यांच्या मनातील सरकारचे स्वरूप असे आणि ते नम्रपणे म्हणत असत की अशा तऱ्हेचे सरकार प्रस्थापित करण्याचा मार्ग एकच आहे आणि तो म्हणजे क्रांतीचा.

हावडा-शिवपूर कटाचा खटला 1910 सालच्या सुरूवातीला भरण्यात आला. बहुतेक सर्व आरोपींना खटल्यात नरेन् आणि जतीन मुखर्जी मिळून एकंदर 46 आरोपी होते. 29 जानेवारी रोजीच त्यांना पकडण्यात आले. मॅजिस्ट्रेटची चौकशी 4 मार्चपासूनच सुरू झाली. मॅजिस्ट्रेटने 20 जुलै रोजी हायकोर्टाच्या एका स्पेशल ट्रायब्यूनलपुढे हा खटला चालविण्यात यावा असा आदेश दिला. जो आरोप ठेवण्यात आला होता तो असा की, ''1905 आणि 1910 या काळात आरोपींनी हावडा जिल्ह्यातील शिवपूर येथे त्याचप्रमाणे ब्रिटिश भारतातील अनेक ठिकाणी, एकमेकांच्या आणि इतर लोकांच्या संगनमताने एक कट रचला. या कटाचे उद्दिष्ट हिज मॅजेस्टी किंग एंपरर (ब्रिटिश साम्राज्याचे बादशहा) यांच्याविरूध्द युध्द पुकारणे आणि ब्रिटिश भारताच्या सार्वभौमत्वापासून बादशहाना वंचित करणे हे होते. त्यासाठी आरोपींनी कायद्यानुसार प्रस्थापित झालेल्या भारत सरकारला दहशत बसविणे व त्या कामी बळाचा वापर करणे या मार्गांचा अवलंब केला आणि म्हणून इंडियन पीनल कोडच्या 121अ या कलामाखाली शिक्षापात्र ठरणारा त्यांनी गुन्हा केला.''[6] सरकारने या कटाचा संबंध अनेक गुन्ह्यांशी जोडला. हे राजकीय स्वरूपाचे गुन्हे आहेत असा सरकारचा दावा होता. त्या दृष्टीने ''दोन पोलिस अधिकाऱ्यांचे व एका बातमी देणाऱ्या व्यक्तीचा खून करणे. शस्त्रास्त्रे व दारूगोळा जमा करणे, दहाव्या जाट पलटणीच्या राजनिष्ठेला धक्का देणारी कृती करणे, वगैरे गुन्ह्यांची नोंद करण्यात आली. या कटासाठी द्रव्य सहाय्य गोळा करण्याच्या हेतूने भद्र लोकांनी बरेचसे दरोडे घातले आणि अर्थातच ते राजकीय स्वरूपाचे दरोडे होते असाही सरकारने दावा केला.''[7]

या खटल्यातील तेहतीस आरोपींना निर्दोष म्हणून सोडून देण्यात आले. पण त्यांना वर्षभरापेक्षा अधिक काळ तुरुंगात काढावा लागला. नरेन्ही सुटलेल्या आरोपीत होता. त्याने नऊ महिने कारावास एकाकीपणे भोगला. त्यांच्या

दृष्टीने हा हृदय पिळवटून काढणारा अनुभव होता. चिंग्रीपोटा दरोड्याच्या जोडीला नरेन् याच्यावर 1908 व 1909 या कालखंडात सहा दरोडे घातल्याचाही आरोप ठेवण्यात आला होता. तथापि मुख्य न्यायाधीशांना असे वाटले की सादर केलेल्या पुराव्यातून नरेन् याचा गुन्हा शाबीत होऊ शकत नाही.

या खटल्याच्या निमित्ताने तुरूंगात दिवस काढताना जतीन मुखर्जी, नरेन् आणि इतरांनी आपल्या भावी कार्याची एक योजना तयार केली. ही योजना सशस्त्र उठावाची होती.

पहिली गोष्ट त्या दृष्टीने करावयाची होती, ती म्हणजे सशस्त्र उठावाचा कार्यक्रम सर्व क्रांतिकारक गटांपुढे ठेवून तो स्वीकारण्यासाठी त्यांची मने मिळविणे हा होय. त्यानंतरचे पाऊल म्हणजे त्यांची एकजूट घडवून आणून एका नेतृत्वाखाली त्यांना संघटित करणे हे होय. नरेन्ने दोन्ही कामे आपल्याकडे घेतली आणि ती यशस्वी रीतीने साध्य केली.त्यासाठी त्यांना संबध बंगालमध्ये त्याचप्रमाणे देशातील अनेक भागात हिंडावे लागले. काही काळ तो संन्याशीही झाला. संन्याशी म्हणून त्यांना पोलिसांचा संशय जागृत न करता अधिक सुलभपणे हिंडता आले. काही क्रांतिकारक पुढारी संन्याशी झाले होते आणि नरेन्च्या काही सहकाऱ्यांना वाटले की नरेन्ही त्यांच्याच पावलावर पाऊल टाकीत आहेत. साधुजनांचा तो शोध घेत असलेले पाहून त्यांचा संशय बळावला असणे शक्य आहे. पण लवकरच हे स्पष्ट झाले की नरेन् ज्या विमुक्तीचा शोध घेत होता ती आत्म्याची विमुक्ती नव्हे तर मातृभूमीची मुक्ती होती. त्या दिवसात नरेन् याने बनारस, अलाहाबाद, आग्रा, मथुरा या ठिकाणांना भेटी दिल्या. या संचारातून देशाचे जे उत्कट ज्ञान त्याला घडले आणि जे संबंध त्याने जुळविले त्यांचा पुढील कार्याच्या वेळी त्याला फार उपयोग झाला. वर्षभराच्या आतच एक संयुक्त संघटना प्रस्थापित झाली जिच्या शाखा आणि संपर्क बंगालमध्ये आणि बाहेर पसरला गेला. ही संयुक्त 'संघटना युगांतर' पक्ष म्हणून ओळखली जाऊ लागली.

तुरूंगातून सुटल्यानंतर नरेन् याने प्रामुख्याने दिशाभूल करण्याच्या हेतूने 'इंडिया एक्विटेबल ॲशुरन्स कंपनी'चे प्रतिनिधी म्हणून एक नोकरी धरली. एका तांदुळाच्या गिरणीचे आणि बोलियाघाटामधील एका लाकडाच्या वखारीचे वसुलीचे कामही तो करू लागला. नरेन् हा आता श्रीगोपाल मलिक लेनमधील एका विश्रांतीगृहात प्रामुख्याने राहू लागला. थोड्याच दिवसात त्याने नोकऱ्या सोडल्या आणि एक भोजनगृह उघडले. शस्त्रास्त्रे मिळविण्याचे आणि माहितीची देवाणघेवाण करण्याचे ते एक केंद्रच बनले. हे भोजनगृह सैनिक आणि नाविक यांच्यामध्ये फार लोकप्रिय झाले. कारण नरेन् त्यांच्यासाठी खास खाद्यपदार्थ तयार करीत असे.

क्रांतिकारक गटांच्या हालचाली आता बंगाल पुरत्याच मर्यादित राहिल्या नाहीत. त्या उत्तरेकडील प्रदेशात उदाहरणार्थ, पंजाब, दिल्ली आणि उत्तरप्रदेश यात पसरल्या आणि महाराष्ट्र, मध्यप्रदेश आणि मद्रास यांच्याशीही संबंध प्रस्थापित करण्यात आले. बंगालमध्ये प्रशिक्षित करण्यात आलेल्या तरूणांना त्या विभागात ''कृतींसाठी'' पाठविण्यात येऊ लागले आणि काही वेळा उपयोगात आणले जाणारे बॉम्ब आणि पिस्तुले हीही बंगालमधून येत असत. या प्रकारचे नमुनेदार उदाहरण म्हणजे भारताचे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंग यांच्यावर 23 डिसेंबर 1912 रोजी फेकण्यात आलेला बॉंब होय. त्या दिवशी व्हाइसरॉय हे दिल्लीमध्ये मोठ्या शानदारपणे औपचारिक प्रवेश करीत होते.

युरोप, अमेरिका, ब्रम्हदेश, इंडोनेशिया या देशातील त्याचप्रमाणे बँकॉक, सिंगापूर आणि हॉंगकॉंग यासारख्या ठिकाणच्या भारतीय क्रांतिकारक गटांशीही संबंध प्रस्थापित करण्यात आले. पश्चिमेकडील काही शहरातही मजबूत क्रांतिकारक गट अस्तित्वात आले होते. कॅनडातील व्हॅनकूव्हर आणि अमेरिकेतील सानफ्रान्सिस्को ही या बाबतीत उदाहरणे देता येतील.

सशस्त्र उठावासाठी जी तयारी करावयाची त्यांना अर्थातच द्रव्याची मदत आवश्यकच होती. हे द्रव्य उभे करण्याचे कार्य नरेन् याच्याकडे सोपवण्यात आले होते. ''प्राथमिक खर्चासाठी द्रव्य सहाय्य उभे करण्याचे जे कार्य माझ्याकडे सोपवून देण्यात आले होते, ते लवकरच योजनाबध्द रीतीने पार पाडण्यात आले.'' असे रॉय यांनी नंतर लिहिलेल्या आपल्या स्मृतिचित्रात नमूद केले आहे.[8] स्वत: नरेन् याच्या नेतृत्वाखाली जे काही दरोडे घालण्यात आले, त्यातून हे द्रव्य गोळा करण्यात आले. त्यापैकी एक दरोडा खास उल्लेख करण्याच्या योग्यतेचा आहे. 12 फेब्रुवारी 1915 रोजी नरेन् याने दोन साथीदारांसह 'बर्ड ॲन्ड कंपनी'ची रोख रक्कम भरदिवसा लुटली. कलकत्त्यातील गार्डन रीच विभागात हा दरोडा घालण्यात आला. पुढे जी दरोड्याची मालिका गुंफण्यात आली त्यातील हा पहिला दरोडा होता. 'गार्डन रीच' राजकीय दरोडा म्हणून तो प्रख्यात आहे. या दरोड्यामुळे उभ्या कलकत्त्यात खळबळ माजली. या दरोड्याची सारी कृती काही मिनिटांच्या आत, नुसता पिस्तुलांचा देखावा करून यशस्वी करण्यात आली. आश्चर्य असे की यावेळी एकही गोळी झाडण्यात आली नाही.'' डॉ जदुगोपाल मुखर्जी यांच्या मते ''गार्डन रीच'' दरोडा हा लोकविलक्षण धैर्याचा व धाडसाचा प्रकार होता आणि नरेन् भट्टाचार्य यांनी शांत डोक्याने ती कामगिरी निर्दोषपणे पार पाडली. एकही गोळी झाडण्यात आली नाही.[9] या दरोड्याशी संबंध असल्याबद्दल नरेन् याना एकदोन दिवसात पकडण्यात आले.

त्यापूर्वी काही महिने आधी दुसरी जी क्रांतिकारक ''कृती'' करण्यात आली होती तिचाही उल्लेख करण्यासारखा आहे. सेडिशन कमिटीच्या अहवालात तिचे खालीलप्रमाणे वर्णन करण्यात आले आहे: ''रोड्डा ॲन्ड कंपनी या कलकत्त्यातील बंदुका तयार करणाऱ्या कंपनीमधे पिस्तुलांची जी चोरी झाली, ती बंगालमधील क्रांतिकारक गुन्ह्यांच्या विकासातील अत्यंत महत्वाची घटना होय. 26 ऑगस्ट 1914 रोजी बुधवारी हा प्रकार घडला. रोड्डा ॲन्ड कंपनीतील ज्या कारकुनाकडे शस्त्रास्त्रे आणि दारूगोळा यांची आयात कस्टम कचेरीकडून सोडवून घेण्याचे काम असे त्याने शस्त्रास्त्रे व दारूगोळ्याच्या 202 पेट्या सोडवून घेतल्या. पण व्हान्सिटार्ट रो मधील मालकाच्या कोठारात फक्त 192 पेट्याच जमा केल्या. बाकीच्या पेट्या आपण मागाहून आणतो असे सांगून तो निघून गेला. तो परत आलाच नाही आणि तीन दिवसानंतर पोलिसांना याबद्दलची बातमी देण्यात आली. त्या गहाळ झालेल्या दहा पेट्यांध्ये 50 मॉसर जातीची पिस्तुले आणि त्यांना उपयुक्त असा मॉसर जातीचा 46000 गोळ्यांचा दारूगोळा होता. पिस्तुले मोठ्या आकाराची 300 बोअरची होती आणि प्रत्येक पिस्तुलावर जो क्रमांक होता त्याची रोड्डा ॲन्ड कंपनीत नोंद होती. पिस्तुले अशा रीतीने बनविण्यात आली होती व त्यांच्या रचनेचे असे स्वरूप होते की पिस्तुलाच्या टोकाला पिस्तुले असलेली पेटी जोडण्यात आली तर असे एक हत्यार तयार होत असे की जे बंदुकीप्रमाणेच खांद्यावरून उडविता येऊ शकत असे. संबंधित अधिकाऱ्यांना खात्रीलायक बातमी कळली आहे की यापैकी 44 पिस्तुले हातोहात नऊ निरनिराळ्या बंगालमधील क्रांतिकारकांच्या गटांना वाटण्यात आली. आणि एक गोष्ट निश्चित आहे की वाटण्यात आलेल्या या पिस्तुलांचा ऑगस्ट 1914 नंतरच्या काळात दरोडे आणि खून किंवा दरोडे चालण्याचे खून करण्याचे प्रयत्न यांच्यासाठी 54 गुन्ह्यांमधे उपयोग करण्यात आला. ऑगस्ट 1914 नंतर बंगालमधे जे क्रांतिकारक उद्रेक झाले त्यापैकी बहुश: फारच थोड्या उद्रेकांत रोड्डा ॲन्ड कंपनीतून चोरण्यात आलेल्या मॉसर पिस्तुलांचा वापर करण्यात आला नसेल असे खरोखरच निर्धास्तपणे सांगता येईल.[10] ही 'कृती' पार पाडण्यात नरेन्‌ने महत्वाचा वाटा उचलला.

या सुमारास आंतरराष्ट्रीय परिस्थिती तंग झाली होती. युध्दाचे ढग वातावरणात जमा झाले होते आणि इंग्लड व **जर्मनी** यात युध्द पेटण्याचा दाट संभव दिसू लागला होता. परदेशातील त्यांच्या मित्रांकडून क्रांतिकारकांना आधीच माहिती मिळाली होती की युध्द सुरू झाले, तर जर्मनी त्यांना मदत करावयाला तयार होईल.

**भारतामधील क्रांतिकारकांनी जर्मन सत्ताधीशांचा शोध घेऊन त्यांच्याशी**

बोलणी सुरू केली. 1913 च्या अखेरीस नरेन् याने कलकत्त्यातील जर्मन कॉन्सुलेट जनरलमार्फत जर्मनांशी संबंध जुळविण्याचे प्रयत्न सुरू केले. 1914 च्या सुरूवातीला त्याने आणि जतीन मुखर्जी यानी कलकत्त्यातील जर्मन कॉन्सुल जनरलशी चर्चा करण्याच्या हेतूने बऱ्याच बैठका घेतल्या. युध्द सुरू होताच सशस्त्र उठाव आणि गनिमी युध्दपेच यांची संघटना कशी करावी, याबद्दलच्या योजना ठरविणे हाच या बैठकीचा उद्देश होता.

इंग्लड व जर्मनी यांच्यामधील युध्द 1914 च्या ऑगस्टमधे सुरू झाले. क्रांतिकारकानी लगेच या परिस्थितीचा फायदा उठविण्यासाठी आपले प्रयत्न द्विगुणित केले. त्यानी सशस्त्र उठाव करण्याचा निर्णय घेतला आणि जतीन मुखर्जी यांना संयुक्त पक्षाचा सर्वोच्च नेता म्हणून निवडण्यात आले. जतीन मुखर्जी हे त्यावेळी कलकत्त्याच्या बाहेर राहून कंत्राटदाराचे काम करीत होते. तथापि वेळोवेळी ते कलकत्त्यात येऊन जात होते. कालांतराने त्यांना कलकत्त्यात जाणे असुरक्षित झाले. नरेन् यानी लगेच त्यांच्या राहण्याची दुसरी व्यवस्था केली. बालासोरपासून जवळच मोहांदिया या गावी एक सुरक्षित ठिकाण जतीन मुखर्जी यांच्या वास्तव्यासाठी त्यांनी निवडले आणि आपल्यामधील सोईसाठी युनिव्हर्सल एम्पोरियम नावाचे एक व्यापारी केंद्रही त्यांनी स्थापन केले. कलकत्त्यामध्ये अशीच दोन केंद्रे आधीच स्थापन करण्यात आली होती.

उठावासाठी कलकत्त्यात तयारी केली जात होती. या उठावाबद्दल जे साशंक होते, त्यांना नरेन् यानी अशी आश्वासने दिली होती की दळणवळण तोडण्याच्या दृष्टीने सर्व काही पावले उचलली जातील. या आश्वासनातून त्यांनी संशयात्म्यांना आपल्या बाजूला ओढले होते. त्या आश्वासनांच्या पूर्तीसाठी जेव्हा आवश्यक होईल तेव्हा वाहतूक व दळणवळण व्यवस्था विस्कळीत करण्यासाठी चक्रधरपूर व संबळपूर येथे केंद्र उघडण्यात आली. त्यानंतर काही दिवसांनी उठावाच्या योजनेची चर्चा करण्यासाठी बनारस येथे एक बैठक बोलाविण्यात आली. या बैठकीला राशबिहारी बोस, जतीन मुखर्जी, नरेन्, अमरेंद्रनाथ चट्टोपाध्याय व अतुलकृष्ण घोष हे हजर होते. 1915 सालच्या मार्च महिन्यात क्रांतिकारकांना हा संदेश आला की जर्मनी शस्त्रास्त्रे पाठविण्याला तयार आहे. त्या संदेशाबरोबरच एक सूचना आली की याबद्दलचा तपशील ठरविण्यासाठी एक प्रतिनिधी बाटाव्हिया येथे पाठविण्यात यावा. शस्त्रास्त्रे मिळवण्याच्या संभाव्यतेमुळे क्रांतिकारकांमधे विलक्षण उत्साह आला. प्रतिनिधी पाठविण्याचे आमंत्रण त्यानी स्वीकारले. नरेन् याची त्यासाठी निवड झाली आणि त्याच्या राजकीय जीवनाच्या स्थित्यंतरालाच त्यातूनच दिशा मिळाली.

## टीपा

1. या प्रकरणातील माहिती प्रामुख्याने रॉग, समरेन. *द रेस्टलेस ब्रॅम्हिन*, अलायड पब्लिशर्स, मुंबई, 1970 या पुस्तकावर आधारित आहे.
2. *कित्ता*, पृ.2.
3. *कित्ता*,प्रस्तावना.
4. *कित्ता*, पृ.20.
5. हिंदी; ए. के. *एम. एन. रॉय; द मॅन हू लुक्ड अहेड*, मॉडर्न पब्लिशिंग हाऊस, अहमदाबाद, 1938. पृ.8.
6. *द रेस्टलेस ब्रॅम्हिन*, पृ.46.
7. *कित्ता*, पृ.47.
8. रॉय, एम.एन. *मेमुआंज*, अलायड पब्लिशर्स, नवी दिल्ली, 1918. पृ. 3.
9. *द् रेस्टलेस ब्रॅम्हिन*, प्रस्तावना.
10. *सेडिशन कमिटी-1918 रिपोर्ट*, न्यू एज पब्लिशर्स, कलकत्ता 12, 1973. पृ.66.

# शस्त्रास्त्रांच्या शोधात

शस्त्रास्त्रांच्या शोधार्थ नरेन याने 1915 एप्रिलमध्ये जावाला जाण्यासाठी भारताचा किनारा सोडला. त्याला हवी असलेली शस्त्रे काही मिळाली नाहीत. त्याऐवजी एका नवीन व्यक्तिमत्वाचा आणि एका नवीन तत्वप्रणालीचा त्याला लाभ झाला. शस्त्रास्त्रांचा शोध घेण्याच्या त्याच्या मोहिमेच्या अखेरीस हे परिवर्तन झाले.

नरेन्ने 'सी. मार्टिन' हे नाव घेऊन प्रयाण केले. कलकत्त्यातील हॅरी ॲन्ड सन्स या कंपनीचे प्रतिनिधी असल्याचा बहाणा त्याने यावेळी केला. आपल्या चळवळी दडवून ठेवण्याच्या हेतूनेच क्रांतिकारकांनी हे एक साधन निर्माण केले होते. नरेन् याचे जिव्हाळ्याचे मित्र हरिकुमार चक्रवर्ती यांच्याच हाती या कंपनीची सूत्रे होती. शस्त्रास्त्रांच्या शोधासाठी नरेन् याने जो प्रवास केला, त्यावेळी भारतातील क्रांतिकारकांशी संबंध ठेवण्यासाठी त्याने याच कंपनीचा उपयोग करून घेतला.

त्या आपल्या मोहिमेबद्दल लिहिताना एम्. एन्. रॉय यांनी पुढे आपल्या आठवणींच्या ग्रंथात म्हटले, ''1914 साली पहिले महायुध्द सुरू झाल्यानंतर परागंदा झालेल्या भारतीय क्रांतिकारकांचे लक्ष जर्मनीकडे वळले. त्यांना जर्मनी हे आशास्थानच वाटले आणि मोठ्या अपेक्षेने त्यांनी जर्मनीकडे धाव घेतली. वर्षाच्या अखेरीस भारतामध्ये आम्हाला वार्ता कळली की बर्लिनमधील भारतीय क्रांतिकारक समितीला जर्मन सरकारकडून असे आश्वासन मिळाले आहे की भारतीय स्वातंत्र्ययुध्द पुकारण्यासाठी आवश्यक ती शस्त्रसामुग्री आणि द्रव्य जर्मनीतून भारतीय क्रांतिकारकांना मिळू शकेल. ही वार्ता झंझावाताप्रमाणे सर्वत्र पसरली आणि ब्रिटिश सैन्यातील भारतीय सैनिकांवरही तिचा प्रभाव पडल्यावाचून राहिला नाही.'' रॉय पुढे म्हणतात, ''त्यानंतर आमच्यापुढे प्रश्न पडला तो ही आश्वासित शस्त्रसामुग्री भारतात कशी न्यावयाची हा होय. दूरवरच्या जर्मनीतून थेट भारतात तिची वाहातूक करण्याचा प्रश्नच नव्हता. भारतीय क्रांतिकारकांनी म्हणूनच आपला एक दूत जर्मनीला पाठविला आणि अशी सूचना केली की जर्मनांनी भारताजवळच्या एखाद्या तटस्थ राष्ट्रांमध्ये ही शस्त्रास्त्रे पोचवावी. आम्ही त्या दृष्टीने डच ईस्ट इंडीजची निवड केली आणि 1914 च्या अखेरीपूर्वीच मी जावाला जाण्यासाठी भारताचा किनारा सोडला. भारताबाहेरचा माझा हा पहिलाच प्रवास होता.''

नरेन् बाटाव्हियाला पोचल्यानंतर काय घडले त्याचा वृत्तांत सेडिशन कमिटीच्या अहवालात खालीलप्रमाणे देण्यात आला आहे:[1] ''बाटाव्हियाला पोचल्यानंतर जर्मन कॉन्सलने 'मार्टिन'ची थिओडोर हेल्फेरिच यांच्याशी ओळख करून दिली. थिओडोर यांनी जाहीर केले की भारतीय लोकाना क्रांतिकार्यात मदत करण्यासाठी, शस्त्रास्त्रांनी भरलेली एक बोट कराचीच्या रोखाने वाटचाल करू लागली आहे. 'मार्टिन'ने लगेच आग्रह धरला की ही बोट बंगालकडे वळविण्यात यावी.

''त्याविषयी शांघायमधील जर्मन कॉन्सल जनरलशी विचारविनिमय केल्यानंतर ती मागणी कालांतराने मान्य करण्यात आली. 'मार्टिन'ला अर्थातच ही शस्त्रास्त्रे स्वीकारण्यासाठी काही पूर्वयोजना करणे भाग होते. तो भारतात परत आला आणि 'मॅव्हरिक' या नावाखाली जी बोट शस्त्रास्त्रांसहित भारताकडे येणार होती, तिच्यावरील सर्व मालमसाला सुंदरबन विभागातील रायमंगल या ठिकाणी उतरवून घेण्याची सर्व तयारी करण्यात आली. या शस्त्रसाठ्यात 30000 बंदुका, दारूगोळ्याच्या 400 पेट्या तसेच दोन लाख रुपये होते असे सांगण्यात येते. दरम्यान 'मार्टिन'ने कलकत्त्यातील हॅरी अॅन्ड सन्स या एका सुप्रसिध्द क्रांतिकारकाने स्थापन केलेल्या दिखाऊ फर्मला तारेने कळविले ''व्यापार फलदायक आहे.'' जून महिन्यात हॅरी अॅन्ड सन्सने 'मार्टिन'ला तार पाठवून पैशाची मागणी केली आणि त्यानंतर बाटाव्हियातील हेल्फेरिच यांच्याकडून कलकत्त्यातील हॅरी अॅन्ड सन्सकडे पैसे पाठविण्याला सुरूवात झाली. जून आणि ऑगस्टच्या दरम्यान सुमारे 43000 रूपयांचे द्रव्यसहाय्य करण्यात आल्याचे नमूद आहे. सरकारला काय घडत आहे याचा शोध लागण्यापूर्वी त्यापैकी 33000 रूपये क्रांतिकारकांच्या हातात पडलेले होते.''[2]

जूनच्या मध्याला नरेन् भारतात परत आला. मॅव्हरिकवरील मालमसाला हस्तगत करून त्याचा उत्कृष्ट उपयोग करून घेण्याच्या ज्या योजना आखण्यात आल्या होत्या, त्यांचे वर्णन सेडिशन कमिटीच्या अहवालातील शब्दातच करणे अधिक श्रेयस्कर होय. या अहवालात म्हटले आहे ''त्यांनी सारी शस्त्रास्त्रे तीन भागात वाटून खालील ठिकाणी अनुक्रमे पाठविण्याचे ठरविले:

1. पूर्व बंगालच्या जिल्ह्यासाठी हातिया येथे बारिसाल पक्षाच्या सभासदानी त्याची व्यवस्था करावयाची होती.
2. कलकत्ता
3. बालासोर

त्यांचे असे मत होते की बंगालमधील सैन्य दलाशी सामना देण्याइतके मनुष्यबळ आपल्यापाशी आहे. पण बाहेरून कुमक येण्याची त्यांना भीती वाटत होती. या कल्पनेनुसार त्यानी बंगालमध्ये येणाऱ्या तीन रेल्वेचे फाटे

बंद करण्यासाठी मुख्य पूल उध्वस्त करण्याचे ठरविले. जतींद्र यांनी बालासोरकडून मद्रास रेल्वेचा बंदोबस्त करावयाचा होता. भोलानाथ चतर्जी यांना बंगाल-नागपूर रेल्वेचा ताबा घेण्यासाठी चक्रधरपूर येथे पाठविण्यात आले तर सतीश चक्रवर्ती यांनी अजयला जाऊन ईस्ट इंडियन रेल्वेवरील पूल उडवावयाचा होता. नरेन् चौधरी आणि फणींद्र चक्रवर्ती याना हतियाला जाण्याचा आदेश देण्यात आला. तेथे प्रथम पूर्व बंगालमधील जिल्ह्यांचा ताबा घेऊन नंतर कलकत्त्यावर मोर्चा नेण्यासाठी क्रांतिकारकांची जमवाजमव होणार होती. कलकत्त्यातील दल नरेन् भट्टाचार्यजी आणि बिपिन गांगुली यांच्या नेतृत्वाखाली प्रथम कलकत्ता व भोवतालच्या सर्व शस्त्रास्त्रांचा आणि शस्त्रागारांचा ताबा घेणार होते. नंतर फोर्ट विल्यम हस्तगत करून कलकत्ता शहर उध्वस्त करणार होते. 'मॅव्हरिक'मधून येणारे जर्मन अधिकारी पूर्व बंगालमध्ये राहून सैन्यदलाची उभारणी आणि प्रशिक्षण देण्याची व्यवस्था करणार होते.''[3]

मॅव्हरिक आणि त्यावरील मालमसाला येऊन पोचलाच नाही. प्रतीक्षा करण्यासाठी व शस्त्रास्त्रे ताब्यात देण्यासाठी रायमंगलला ज्या क्रांतिकारकांना पाठविण्यात आले होते, ते वीस दिवस वाट पाहून कलकत्त्याला परत गेले. नरेन् आणि त्यांच्या सहकाऱ्यांची भयंकर निराशा झाली. पण त्यांना काहीही करता येण्यासारखे नव्हते.

त्यानंतर निरनिराळ्या मार्गांनी अनेक संदेश पाठविल्यानंतरही जेव्हा काही प्रतिसाद मिळाला नाही; तेव्हा काही नवीन व्यवस्था करण्यासाठी नरेन्ला पुन्हा बाटाव्हियाला पाठविण्याचे ठरले. जर्मनांबरोबर काही नवीन चर्चा करणे हाच त्यामागील उद्देश होता. यापुढे खुष्कीच्या मार्गाने शस्त्रास्त्रे आणण्याचा प्रयत्न करणे ही नवीन कल्पना उदयास आली होती. त्याबद्दल रॉय आपल्या आठवणीत लिहितात: ''बोटीतून शस्त्रास्त्रे आणण्याचा प्रयत्न फसल्यानंतर मी दुसऱ्यांदा परदेशी गेलो. यावेळी चीनकडून खुष्कीच्या मार्गाने शस्त्रास्त्रे आणण्याचा दुसरा मार्ग आम्ही चोखाळणार होतो. ती शस्त्रास्त्रे नैऋत्य सीमेवरून, गुप्तपणाने आणावयाची होती. अबॉर टोळीवाल्यांनी या विभागात नुकतेच बंडही पुकारले होते. शस्त्रास्त्रे आणण्यासाठी मी परदेशी गेल्यानंतर आमच्या सहकाऱ्यांचा एक गट, आमच्यापैकी सर्वात हुशार व्यक्तीच्या नेतृत्वाखाली नैऋत्य सीमेवर जाऊन अबॉर आणि शेजारच्या टोळीवाल्यांना पुन्हा एकदा बंडाला पुकारा करण्यासाठी चिथावणी देणार होता.यावेळी त्या बंडाला बाहेरून येणारी शस्त्रास्त्र व युध्द सामुग्री यांची मदत मिळणार होती.''[4]

नरेन् यांच्या प्रयाणानंतर त्यांच्या पक्षावर एक महान संकट कोसळले. जतींद्रनाथ मुखर्जी यांनी पोलीसांशी जी घनघोर लढाई दिली, ती बंगालमधील क्रांतिकारक आंदोलनाच्या इतिहासात बालासोरची लढाई म्हणून अजरामर झाली आहे.

क्रांतिदलाच्या सहसेनानीचा मृत्यू घडवून आणणाऱ्या या लढाईमुळे सबंध आंदोलनांचा कणाच मोडला. त्या आघातातून बाहेर पडावयाला आणि आपले क्रांतिकार्य सुरू करावयाला क्रांतिदलाला पुष्कळ वर्षे लागली.

दरम्यान शस्त्रास्त्रांचा शोध घेण्यात नरेन् गर्क राहिला. यावेळी जर्मन लोकांमधील सहकार्याची भावना वरील मंदावली होती. जर्मन कॉन्सलची तक्रार अशी होती की भारतीय लोकांपाशी संघटना तर नाहीच. पण त्यांना गुपितेही संभाळता येत नाहीत. नरेन्च्या कॉन्सलशी तीन चार बैठकी झाल्या. पण प्रगतीचा ठावठिकाणाही त्याला दिसेना. त्याचे आठवणीत खालीलप्रमाणे वर्णन करण्यात आले आहे. ''समुद्रपार इंडोनेशियाच्या मार्गे मदत आणण्याचा मी आणखी एक प्रयत्न केला. त्यासाठी जी योजना आखण्यात आली होती ती अशी: सुमात्राच्या उत्तर सीमेवरील बेटात जी जर्मन जहाजे बंदिस्त करून ठेवण्यात आली होती त्यांचा उपयोग करून अंदमान बेटावर हल्ला चढवावयाचा आणि तेथील कैद्याना मुक्त करून त्यांच्यासह मुक्तिसेना ओरिसाच्या किनाऱ्यावर उतरवावयाची. ही जहाजे शस्त्रसज्ज होती. कारण मोठी जर्मन जहाजे युध्दकार्यासाठी सज्ज ठेवण्यात आली होती. त्यांच्यापैकी प्रत्येकावर अनेक तोफा व बंदुकाही ठेवण्यात आलेल्या होत्या. जहाजातील खलाशी नाविक दलातीलच होते. बंदी छावणीतून त्यांनी निसटावयाचे, जहाजांचा ताबा घ्यावयाचा आणि जहाज समुद्रात हाकारावयाचे. प्रत्येक जहाजावर ठेवण्यात आलेल्या खलाशांना सहजपणे जहाजाचे यंत्र चालविणे शक्य होते. चिनी चाच्यांच्या सहाय्याने असंख्य बंदुका इतर लहानसहान हत्यारे आणि आवश्यक तो दारूगोळा पैदा करून जहाजांवर चढविता आला असता. ही सुसज्ज योजना बारगळली. त्याचे कारण जर्मनांना हा गंभीर प्रयोग करावयाचा नव्हता. अखेरच्या क्षणी शस्त्रास्त्र खरेदीसाठी लागणारे द्रव्य उपलब्ध झाले नाही आणि या योजनेच्या अंमलबजावणीचा हुकूम द्यावयाचा त्याच दिवशी जर्मन कॉन्सल जनरल रहस्यमय रीतीने अदृश्य झाला.''[5]

आणखी एक जो प्रयत्न नरेन्ने केला तो फार महत्वाकांक्षी स्वरूपाचा होता. त्या प्रयत्नातून नरेन्ची सन् यत् सेन व चिनी क्रांतीचे इतर नेते यांच्याशी गाठभेट होऊ शकली आणि त्याला चीनमधे प्रवास करण्याची संधी प्राप्त झाली. त्या प्रयत्नाच्या संदर्भात तिएन्त्सीन या चिनी शहरात एक रात्र ब्रिटिशांच्या ताब्यात नरेन्ला राहावे लागले. ब्रिटिश कॉन्सल जनरलची न्यायप्रियता आणि स्वतःचे प्रसंगावधान यांनी नरेन्ला त्या पेचातून सोडविले. 1915 च्या अखेरीस ब्रम्हदेश आणि भारत यांच्या सीमेवरील युनान आणि झेकुयान या चिनी प्रांतात बंडाचा पुकारा झाला. युआन शि-काई यांनी राजेशाहीच्या पुनर्स्थापनेची जी योजना आखली होती तिच्याविरूध्द हे बंड होते.

बंडखोरांपाशी मुबलक शस्त्रास्त्रे होती. नरेन्ने अशी सूचना केली की चिनी बंडखोरांनी यापैकी काही शस्त्रास्त्रे सीमेपलीकडील भारतीय क्रांतिकारकांच्या हवाली करावी. सन् यत् सेनला ती कल्पना पसंत पडली होती आणि त्यानी नरेन्ला सांगितले की हा शस्त्रास्त्रे खरेदी करण्यासाठी पन्नास लक्ष डॉलर्सची रक्कम जर्मन वकिलाकडून प्राप्त करून घेण्यात यावी. हे द्रव्य उपलब्ध झाले, तर सन् यत् सेन हे आपला दूत युनानला पाठवितील आणि त्यानंतर तो 'अनमोल खजिना' ताब्यात घेण्यासाठी नरेन् स्वत: युनानची यात्रा करेल. कित्येक वर्षानंतर रॉय यांनी आपल्या आठवणीत म्हटले, ''या भव्य योजनेने माझ्या साहसी भावना उचंबळून आल्या. अखेरीस कदाचित् काही महिन्यांच्या आत एक सैन्यदल उभारण्यासाठी आवश्यक असलेली विपुल शस्त्रास्त्रे घेऊन भारताच्या सीमेवर अवतीर्ण होण्याचे आपले स्वप्न साकार होईल या आशेने माझे मन भारून गेले.''[6]

ही योजनाही फसली. कारण अखेरच्या क्षणी या साठी जे विपुल द्रव्य लागणार होते; ते खर्च करावयाला जर्मन तयार झाले नाहीत. नरेन्ला त्याचा संताप आला. त्याचे मनही कडवट झाले. कालांतराने रॉय यानी आपल्या आठवणीत नमूद केले ''जर्मनांना आम्हाला आवश्यक ती मदत द्यावयाची नव्हतीच. भारतीय क्रांतिकारकाना शस्त्रास्त्रे पुरविण्याची सारी जर्मन योजना ही एक धादांत फसवणूक होती. तो एक कुटिल डाव होता.'' शस्त्रास्त्रांचा नरेन्चा शोध या अवस्थेत लुप्त झाला. पण नव्या जगात पोचल्यानंतर काही महिने तरी त्याचा हा ध्यास चालूच राहिला.

जर्मन वकिलाने नरेन्ला बर्लिनला जाण्यासाठी म्हणून नव्या जगाकडे पाठविले. आणि वकिलाने नरेन्ला सांगितले की चिनी शस्त्रास्त्रे खरेदी करण्यासाठी पन्नास लक्ष डॉलर्सची जी प्रचंड रक्कम नरेन्ने मागितली होती, ती मंजूर करणे वरिष्ठ अधिकाऱ्यांच्याच हाती आहे. म्हणून त्याने नरेन्ला सल्ला दिला की त्याने बर्लिनला जाऊन सर्वोच्च युध्द नेता व त्याची प्रभावळ यांच्यापुढे ही योजना मांडावी. ॲडमिरल फॉन हिंटझे हा त्यावेळी चीनमधील जर्मन वकील होता. त्याने नरेन्ला बर्लिनला जावयाचा सल्ला दिला, तो या भावनेने की ''माझी योजना लष्करी दृष्टीने यथार्थ असल्याची त्याची खात्री पटली होती आणि म्हणून लष्करी श्रेष्ठी कदाचित् हे द्रव्य उपलब्ध करून द्यावयाला तयारही होतील.''[7] त्यानेच या यात्रेची सर्व तयारी केली आणि फादर मार्टिन या नावाने नरेन्ला पासपोर्टही काढून दिला. फादर मार्टिन हे पाँडिचेरीचे नागरिक म्हणून धर्मशास्त्रांचा अभ्यास करण्यासाठी पॅरिसला जात असल्याचाही त्यात उल्लेख होता.

तोवर नरेनला लढाईत धारातीर्थी पडलेले आपले नेते व सेनानी जतीन मुखर्जी यांच्या दुःखद निधनाची वार्ता कळली होती. त्याला हेही कळले होते की क्रांतिकारक आंदोलनातील आपले अनेक सहकारी पकडले गेले आहेत. त्यांच्यापैकी काहींना दीर्घ कारावासाची शिक्षा झाली आहे आणि बरेचजण भूमिगत झाले आहेत. मध्यंतरीच्या काळात हे आंदोलनच विस्कळीत झाले होते आणि म्हणून नरेन्‌ला भारतात परत जाण्याची आस्थाही उरली नव्हती.

## टीपा

1. *मेमुआंज,* पृ. 3
2. *सेडिशन कमिटी रिपोर्ट,* पृ. 121
3. *कित्ता,* पृ. 122.
4. *मेमुआंज,* पृ. 4.
5. *कित्ता,* पृ. 7.
6. *कित्ता,* पृ. 7
7. *कित्ता,* पृ. 14

# अमेरिका आणि मेक्सिको

नरेन् जो लवकरच एम.एन्.रॉय म्हणून ओळखला जाणार होता - अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर सान फ्रान्सिस्को येथे 1916 च्या जूनमध्ये उतरला. त्याचे आगमन दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय राहिले नाही. एका स्थानिक वृत्तपत्राने वार्ता देताना म्हटले ''निप्पॉन मारू ही हाँगकाँगहून आलेली बोट आज बंदराला लागली तेव्हा तीत एक रहस्यमय व्यक्ती आढळून आली. त्याचे नाव चार्ल्स ए. मार्टिन असे होते. पण वस्तुतः तो हिंदू असून उच्च ब्राम्हण कुळातील आहे. मार्टिनने जाहीर केले की आपण फ्रेंच भारतीय बंदरातून बोटीत प्रवेश केला आणि अभ्यासासाठी पॅरिसला जाण्याचा आपला मनोदय आहे. बोटीतील उतारूनी मात्र सांगितले की त्या बंदरात या उतारूने प्रवेश केला नाही. तो एकतर क्रांतिकारक पुढारी असावा किंवा ब्रिटिश सरकारचा हस्तक तरी असावा, असा आपला संशय आहे असे त्यांनी सांगितले.''[1]

ही प्रसिध्दी नरेन्ला फारशी बरी वाटली नाही. कारण इतके दिवस त्याने जे कार्य केले होते त्याची निष्फळता त्याला अनुभवाने पटली होती. आणि यापुढे त्याला निराळ्या दिशेकडे वळण्याची इच्छा झाली होती. अमेरिका आणि मेक्सिको या देशातील वास्तव्यात तो या दिशेकडे वळलाही. एका ओळखीच्या भारतीय मित्राकडे स्टॅनफर्ड विद्यापीठाच्या परिसरामध्ये तो राहावयाला गेला असताना त्याने त्याला अशी सूचना केली की गतायुष्यावर पडदा टाकण्यासाठी व नव्या जीवनाची सुरूवात करण्यासाठी त्याने आपले नावच बदलून टाकावे. नरेन्ने तो सल्ला स्वीकारला आणि मानवेंद्रनाथ रॉय असे नाव धारण केले. खरे तर मानवेंद्रनाथ हे नरेंद्रनाथ सारखेच नाव आहे. पण रॉय हे आडनाव भट्टाचार्य पासून अगदीच वेगळे आहे. रॉय हे नाव बंगालमध्ये फार रूढ आहे. ते नाव का स्वीकारण्यात आले हे समजण्यासारखे नाही.

एम.एन्.रॉय हे स्टॅनफर्ड विद्यापीठाच्या परिसरामध्ये जन्माला आले. रॉय यानी तो आपला 'पुनर्जन्म' होय असे म्हटले आहे. आपल्या आठवणीत त्यांनी म्हटल्याप्रमाणे या पुनर्जन्मामुळे निष्फळ पूर्वायुष्याकडे पाठ फिरवून साहस आणि कर्तृत्व यानी फुलून जाऊ शकणाऱ्या नव्या जीवनाचा ध्यास घेण्याची त्यांना संधी मिळाली. ते म्हणतात ''नव्या जगातील रोमांचकारी

प्रवासाची ही सुरूवात होती.''[2] तथापि, भारतातील क्रांतीसाठी शस्त्रास्त्रे संपादन करण्याचे जुने ध्येयस्वप्न मानसिक संघर्षाशिवाय त्यांना सोडता आले नाही. अमेरिका आणि मेक्सिको या दोन्ही देशात त्या स्वप्नाचा त्यांच्या मनावर प्रभाव राहिलाच. अखेरीस जेव्हा त्यांना पटले की या बाबतीत जर्मनाना आस्था राहिलेली नाही तेव्हाच त्यांनी हे ध्येयस्वप्न सोडले. अर्थात अधिक व्यापक क्रांतीच्या नव्या ध्येयदर्शनाने त्यांचे मन भारून गेल्यामुळेही जुन्या ध्येयस्वप्नांचा त्यांना त्याग करावासा वाटला असेल यात शंका नाही.

आतापर्यंत पोलिसांच्या दडपशाहीमुळे भारतातील क्रांतिकारक संघटना कोसळूनच पडली होती. म्हणून शस्त्रास्त्रे संपादन करता आली असती, तरी त्यांचा उपयोग करण्याची शक्यता नव्हती.

स्टॅनफर्डमध्ये रॉय यांची पुष्कळ विचारवंत आणि राजकीय कार्यकर्त्यांशी भेट झाली. तेथे त्यांचे मैत्रीचे संबंधही जुळले. त्यातील सर्वात फलदायक अशी मैत्री ठरली असेल, तर ती ईव्हलिन ट्रेंट यांच्याशी होय. ती त्यांच्या बरोबर न्यूयॉर्कला गेली आणि ते दोघे विवाहबध्द झाले. ईव्हलिन ही त्यानंतर रॉय यांची राजकीय सहचरी झाली. ती रॉय यांच्याबरोबर मेक्सिको आणि रशियाला गेली आणि रॉय यांच्या राजकीय तशाच साहित्यिक कार्यात तिची फार मदत झाली. रॉय यांच्या एकदोन पुस्तकांची ती सह-लेखिकाही होती. वेळोवेळी तिने 'शांतिदेवी' या टोपणनावाने कम्युनिस्ट वृत्तपत्रात लेखनही केले. हे सहकार्य 1926 साली त्यांची फारकत होईपर्यंत चालू राहिले.

न्यूयॉर्कमध्ये रॉय यांची अनेक अमेरिकन समाजवादी व इतर प्रगतिवादी लोकांशी ओळख झाली. भारतीय राष्ट्रवादी पुढारी लाला लजपतराय यांच्याशीही त्यांचा संपर्क आला. त्या दोघांमधे मैत्रीचे संबंध जडले. न्यूयॉर्क मध्येच रॉय यांचा समाजवादाचा पध्दतशीर अभ्यास सुरू झाला. समाजवादाने खंडन करण्याच्या हेतूने त्यानी तो सुरू केला होता. पण लवकरच त्याना आढळून आले की आपणच स्वतः समाजवादाचे उपासक होत आहो. सुरूवातीला रॉय याना समाजवादाची जडवादी विचारसरणी मान्य होत नव्हती. पुढे मायकेल बोरोदिन या रशियन क्रांतीच्या पुढाऱ्याशी त्यांची भेट आणि मैत्री झाली, तेव्हा त्यांच्या मार्गदर्शनाखाली रॉय यानी आधिभौतिक तत्वज्ञानाचा स्वीकार केला. राष्ट्रवादापासून समाजवादाकडे संक्रमण ही रॉय यांच्या राजकीय जीवनातील मोठीच घटना होती. बंकिमचंद्र आणि विवेकानंद आणि पुराणमतवादी हिंदू तत्वज्ञान यांनी जतन आणि पोषण केलेल्या त्यांच्या पूर्वायुष्याशी ही फार मोठी फारकत होती.

रॉय यांचा क्रांतीचा ध्यास कायमच राहिला. पण समाजवादाकडे झुकल्यानंतर क्रांतीचे जे स्वरूप त्यांच्या डोळ्यापुढे तरळू लागले, ते लढाऊ राष्ट्रवादी

म्हणून ते ज्या क्रांतीची आराधना करीत होते त्यापासून भिन्न होते. एक, नव्या समाजपध्दतीचे चित्र रंगवीत होती; तर दुसरी फक्त ब्रिटिश राजवटीच्या पदच्युतीपुरतीच मर्यादित होती. एक, प्रचंड जनतेच्या सुनियोजित कार्यातून परिणत होणार होती, तर दुसरी शूर क्रांतिकारकांच्या लहानशा गटाकडून घडविली जाणार होती. एक, आर्थिक शक्तींच्या कार्यकारणावर आधारलेली होती, तर दुसरीला त्याबद्दल आस्थाच नव्हती. एक, तर्कशुध्द जडवादी दृष्टिकोनाचा स्वीकार करण्याचा आग्रह धरीत होती, तर दुसरीला क्रांतिकारक वा जनता यांच्या मानसिक वा सामाजिक दृष्टिकोनात बदला घडून येण्याची काहीच आवश्यकता वाटत नव्हती. रॉय यानी समाजवादाचा सारा मार्ग एका टप्प्यात गाठला नाही. त्यांची प्रगति हळूहळूच झाली. पण समाजवाद ते कम्युनिझम हे जे त्यांचे संक्रमण पुढील वर्षी मेक्सिकोमध्ये झाले, ते मात्र झपाट्याने घडून आले. समाजवादाचे ध्येय साध्य करण्याच्या दृष्टीने त्या दिवसात कम्युनिझम हा सर्वात मोठा लाभदायी मार्ग मानला जात असे.

रॉय यांच्या समाजवादाच्या अभ्यासात एकदम खंड पडला, ते हिंदू-जर्मन कटाच्या खटल्यात गोवले गेले तेव्हा. 1917 च्या जून महिन्यात अमेरिकेने युध्दात पदार्पण केल्यानंतर सानफ्रान्सिस्को येथे हा कटाचा खटला उभारण्यात आला. या खटल्यात अमेरिकन, जर्मन व भारतीय मिळून 100 लोकांना गोवण्यात आले. ''कायसरची आर्थिक मदत घेऊन, जर्मन परराष्ट्र खात्याच्या प्रेरणेने भारतात बंडाचा उठाव करणे आणि त्या बंडाचा बीमोड करण्यासाठी ब्रिटनला युरोपमधून आवश्यक त्या फौजा हलविण्याला भाग पाडून जर्मनीच्या युध्दकार्यात सहाय्यभूत होणे, हे उद्दिष्ट साधण्यासाठी या आरोपींनी देशव्यापी कटाची रचना केली आणि अमेरिकेच्या अलिप्ततावादी कायद्यांचा भंग केला, असा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला.''[3]

रॉय यांना एका संध्याकाळी कोलंबिया विद्यापीठाच्या आवारात पकडण्यात आले. लाला लजपतराय यांच्या भाषणाला हजर राहिल्यानंतर ते या विद्यापीठात गेले होते. त्या रात्री काही तास त्यांना तुरूंगात काढावे लागले. पहाटेच्या सुमारास त्यांना सोडण्यात आले व काही तासाच्या आतच टाउन हॉलमधे ग्रँड ज्यूरीपुढे हजर होण्याचा त्यांना आदेश देण्यात आला. ग्रँट ज्यूरीने ''अमेरिकेच्या इमिग्रेशन कायद्यांचा भंग केल्याचा आरोप'' त्यांच्यावर ठेवला आणि खटल्याचा निकाल लागेपर्यंत व्यक्तिगत जामीनावर त्याना मोकळे केले. रॉय हे परत कोर्टात न येण्याचा निर्धार करून कोर्टातून बाहेर पडले. कालांतराने आपल्या आठवणीत रॉय लिहितात: ''अटक करून घेणे हा तोपर्यंत क्रांतिकारक गुण मानला जात नसे. त्याला तशीच कारणेही होती. गांधीपूर्व युगात राजकीय गुन्ह्यासाठी शिक्षा भोगणे, हा सरकारी आदरातिथ्य

भोगण्याचा प्रकार झालेला नव्हता. त्यासाठी वर्षानुवर्षांचे खडतर जीवन भोगावे लागत असल्यामुळे देशभक्तीची कसोटीच लागत असे. साहजिकच त्या काळातील क्रांतिकारक शक्य तोवर तुरूंगाच्या बाहेर राहण्याचा प्रयत्न करीत असत. एकवेळ भले फासाच्या तख्तावर चढण्याचीही त्यांची तयारी असे.''[4]

फरारी होणे यात रॉय यांना काहीच नवीन नव्हते. भारतात अनेक वेळा त्यानी हा प्रयोग केला होता. आता त्याचाच आश्रय घेण्याचे त्यानी ठरविले. समाजवादी मित्रांकडून त्यानी मेक्सिकोबद्दल बरेच ऐकले होते. तेथे जी सामाजिक क्रांती घडून येत होती तिच्याबद्दल आणि युकातान नावाच्या त्यातील प्रदेश राज्यात समाजवादाचा जो प्रयत्न चालू होता, त्याबद्दलही त्यानी ऐकले होते. त्या राज्याचा गव्हर्नर जनरल आलव्हारादो याच्यासाठी एक ओळखपत्रही त्यानी हस्तगत करून ठेवले होते. त्यांच्या मनाचा पुरा निश्चय झाला. त्यानी मेक्सिकोत पलायन करण्याचे ठरविले. मेक्सिकोची सरहद्द कित्येक मैल दूर होती. पण तिच्यावर सक्त पहारा नव्हता. रॉय यांनी न्यूयॉर्कच्या पोलिसांच्या हातावर तुरी दिल्या आणि दोन दिवसांच्या आगगाडीच्या प्रवासानंतर त्यांनी मेक्सिकोत पदार्पण केले.

रॉय 1917 च्या जुलै महिन्यात मेक्सिकोला पोचले. अमेरिकेत जामीन झुगारून दिल्यामुळे ते कायद्याच्या दृष्टीने फरारीच होते. भारतात राजकीय दरोडे व इतर गुन्हे केल्यामुळे ब्रिटिश न्यायासनापुढेही ते गुन्हेगारच ठरलेले होते. पण त्या युध्दकाळात मेक्सिको अधिकृत रीतीने तटस्थ होता. तथापि, त्याची सहानुभूती जर्मनीकडे झुकलेली होती. त्यामुळे अमेरिका वा ग्रेट ब्रिटन यातील राजकीय गुन्हेगाराना त्या देशात प्रवेशबंदी नव्हती. मेक्सिको हे त्यांच्या दृष्टीने सुरक्षित बंदर होते.

रॉय हे मेक्सिकोत आले ते निष्कांचन अवस्थेत. त्याना कोणी मित्रही नव्हते. आधार वाटावा अशी एकच गोष्ट त्यांच्यापाशी होती, ती म्हणजे स्टेट ऑफ युकातानचे गव्हर्नर जनरल अलव्हारादो याना उद्देशून देण्यात आलेले ओळखपत्र होय. पण युकातान मेक्सिकोपासून फार दूर होते आणि तेथून जाणे जवळजवळ अशक्य असे होते. त्या ओळखपत्रामुळे रॉय याना मेक्सिकोतील सर्वोच्च राजकीय वर्तुळात प्रवेश मिळणे सहज शक्य झाले. जावामध्ये जर्मन लष्करी यंत्रणेशी त्यांचा जो संबंध जडला होता, त्यातून बरेच द्रव्यसहाय्यही त्याना उपलब्ध झाले. या दोन भाग्यशाली आधारांच्या जोरावर रॉय यानी मेक्सिकोतील आपल्या जीवनाला सुरूवात केली. त्यावेळी त्याना अणुमात्रही कल्पना आली नसेल की कालांतराने देशाच्या राजकीय जीवनात आपण काही महनीय कामगिरी बजाविणार आहो. रॉय यानी जी कामगिरी बजाविली ती कोणत्याही निकषावर अजोडच मानावी लागेल. ती

अपूर्व ठरली ती या दृष्टीने की एक राजकीय निर्वासित म्हणून देशात आलेल्या एका परस्थाने ही कामगिरी पार पाडली.

मेक्सिकोत पाऊल टाकल्यानंतर उण्यापुऱ्या एक आठवड्याच्या आतच इंडोनेशियात पूर्वी भेटलेल्या दोन जर्मन अधिकाऱ्यांशी त्यांची भेट झाली. त्यानी लगेच आपल्या श्रेष्ठींशी रॉय यांची गाठ घालून दिली. नरेन् म्हणून रॉय यानी चीनमध्ये शस्त्रास्त्रे खेरदी करून ती भूमीमार्गाने भारतात उतरविण्याबद्दल जी योजना आखली होती त्याबद्दल या भेटीत चर्चा झाली. ती योजना मंजूर करण्यात आली. तिचा पाठपुरावा करण्यासाठी रॉय हे तसे फारसे उत्सुक नव्हते. तरी 'सवयीने उचल खाल्ल्यामुळे' ते जावयाला तयार झाले. पुढे ती योजना बारगळली कारण ज्या जपानी बोटीने रॉय प्रवास करणार होते ती विशिष्ट बंदराला लागलीच नाही. ते लगेच मेक्सिको शहरात परतले आणि तेव्हापासून जे राजकीय कार्य त्यांना करावयाचे होते; त्याची संधी मिळण्याची वाट पहावयाला त्यांनी सुरूवात केली.

जर्मन अधिकाऱ्यांशी संबंध आल्यामुळे रॉय यांचा दुहेरी फायदा झाला. त्यांना मेक्सिकोच्या अध्यक्षांसहित राज्यकर्त्या वर्तुळात प्रवेश मिळाला आणि बरेच मोठे द्रव्य त्यांच्या हाती आले. त्यांच्या चीनमधील कामगिरीसाठी त्यांना हे द्रव्य देण्यात आले. चीनमधील कार्य शक्य नाही, हे कळून येताच हे द्रव्य जर्मनांना परत करण्याचाही विचार त्यांच्या मनात घोळत होता. पण अखेरीस हे द्रव्य आपल्याकडेच ठेवण्याचा त्यांनी निर्णय घेतला. यातून एक नैतिक पेच त्यांच्यापुढे उभा राहिला. पण त्यावर त्यांनी असा तोडगा काढला की या साऱ्या द्रव्याचा क्रांतिकार्यासाठी उपयोग करावा. तसा तो त्यांनी केलाही. त्यांनी प्रथम मेक्सिकोतील समाजवादी पक्षाच्या प्रगतीसाठी हे द्रव्य कामी लावले आणि त्यानंतर बोरोदिन आणि वॉशिंग्टनमधील रशियन व्यापारी केंद्र यांच्यासाठी त्यांनी आर्थिक सहाय्य उभे केले. त्याविषयी कालांतराने रॉय यांनी आपल्या आठवणीत लिहिले, ''बोल्शेव्हिकांशी माझा संबंध त्यांना आर्थिक मदत देऊन जडला...बोल्शेव्हिकांनी सत्ता काबीज केल्यानंतर कम्युनिस्ट आंदोलनाचा पुरस्कार करण्यासाठी जगाच्या कानाकोपऱ्यात रशियाने सोनेनाणे पाठवण्यास सुरूवात केली. निदान एकदा तरी ही वाहतूक उलट दिशेने झाली.''[5] कम्युनिस्ट इंटरनॅशनलमधील त्यांच्या कारकीर्दीतील पहिल्या काही वर्षात रॉय यांच्याकडून मिळालेल्या या आर्थिक सहाय्याची जाणीवपूर्वक नोंद करण्यात येत असे.

रॉय मेक्सिकोला पोचले तेव्हा जनरल व्हेनुस्तियानो करांझा यानी आपले श्रेष्ठत्व प्रस्थापित करून त्या राज्याचे अध्यक्षपदही स्वत:कडे घेतले होते. देशातील यादवी युध्द संपले होते. पण अंतर्गत परिस्थिती अस्वस्थतेची

होती. काही भागात केंद्रीय सत्तेचा आदेश जुमानला जात नव्हता. प्रेसिडेंट करांझा यानी नवी राज्यघटना पुकारली होती. तीत जनतेला काही हक्क देण्यात आले होते आणि कामकरी व शेतकरी यांच्या हितसंबंधाना अनुलक्षून काही आश्वासने देण्यात आली होती. करांझा यांचे सरकार सर्वसाधारणपणे लोकप्रिय होते. पण संघटित लोकप्रिय गटाचा असा पाठिंबा ते मिळवू शकले नव्हते. रॉय यांच्या आगमनानंतर काही आठवड्यांच्या आत जेव्हा अमेरिकेच्या आक्रमणाचा धोका प्रगट होऊ लागला, तेव्हा अशा पाठिंब्याची अधिकच गरज भासू लागली. त्यावेळी जनमताचा पाठिंबा मिळवून देण्याच्या बाबतीत रॉय यांचा सरकारला फार उपयोग झाला.

रॉय यांनी आपले राजकीय कार्य, 'एल प्युब्लो' या नावाच्या प्रमुख दैनिक वृत्तपत्रात लेख लिहून सुरू केले. हे वृत्तपत्र सरकारचे अनधिकृत मुखपत्र मानले जात असे. हे लेख इंग्रजीत लिहून नंतर देशाची राजभाषा झालेल्या स्पॅनिश भाषेत ते अनुवादित केले जात असत. या लेखांमुळे रॉय हे प्रागतिक राजकीय पुढारी व समाजवादी कार्यकर्ते यांच्या नजरेसमोर आले. मेक्सिको शहरात स्वत:ला समाजवादी म्हणवून घेणारे काही लोक होते. पण समाजवादी असण्यापेक्षा अराजकवादी वा सिंडिकॅलिस्ट त्यांना म्हणणे अधिक श्रेयस्कर होय.

त्यांचा राजकीय कृतीवर किंवा देशाच्या संरक्षणावरही विश्वास नव्हता. मध्यमवर्गीय बुध्दिमंतांशीही संबंध ठेवण्याची त्यांची इच्छा नसे. रॉय यांना त्यांची समजूत घालावी लागली आणि देशातील घडामोडींवर प्रभाव टाकण्यासाठी एक व्यापक पायावरील राजकीय पक्ष स्थापन करण्यासाठी त्यांचे मन वळवावे लागले. या कार्यात त्याना मेक्सिकोत आश्रय घेऊन राहिलेल्या थोड्या अमेरिकन समाजवाद्यांची व शांततावाद्यांची बरीच मदत झाली. साम्राज्यवादी युध्दात भाग घ्यावयाला नकार देणारे हे शांततावादी होते. थोड्याच महिन्यांच्या आत समाजवादी पक्षाच्या स्थापनेच्या दृष्टीने वातावरण तयार झाले. 1917 च्या डिसेंबर महिन्यात मेक्सिको शहरात एक प्रभावी परिषद भरली आणि समाजवादी पक्षाची प्रस्थापना करण्यात आली. परिषदेने रॉय याना पक्षाचे सरचिटणीस म्हणून निवडले. पक्षस्थापनेसाठी त्यानी केलेले कार्य इतके उठून दिसणारे होते की ते परकी गृहस्थ आहेत, याकडे कोणी लक्षच दिले नाही. 'अल काम्पानेरो इंदियो' (भारतीय कॉम्रेड) यांच्याबद्दल इतका आदर वाटत असे की रॉय यांच्या निवडणुकीचे सर्वांनी स्वागत केले.

पक्षाच्या परिषदेने समाजवादी कार्यक्रमाचा स्वीकार केला आणि बहुसंख्य जनतेच्या जीवनात सुधारणा घडवून आणण्यासाठी सरकारने उपाययोजना करावी अशी मागणी केली. त्याचवेळी अमेरिकन आक्रमणाचे जे दुश्चिन्ह प्रगट

होत होते, त्याचा प्रतिकार करण्याच्या बाबतीत सरकारला पाठिंबाही देण्यात आला. या सर्व गोष्टी रॉय यांनी आखलेल्या योजनेनुसार घडून आल्या. त्यांनी स्वत: अध्यक्ष व सरकारमधील प्रमुख लोक यांच्याकडून असे आश्वासन मिळविले होते की सरकारकडून अधिक प्रगतिशील धोरणाचा स्वीकार केला जाईल आणि कामगार व शेतकरी यांच्या ताबडतोबीच्या मागण्या मंजूर करण्यासाठी सर्व प्रकारचे प्रयत्न केले जातील.

सरकारच्या सहानुभूतिपूर्ण धोरणाचे एक निदर्शक चिन्ह म्हणून समाजवादी पक्षाचे नेते प्लुटार्को इलियस कॅलास याना परिषदेनंतर थोड्याच दिवसात मजूर मंत्री म्हणून नेमण्यात आले. या नेमणुकीमुळे रॉय यांच्यावर अधिक मोठी जबाबदारी पडली. त्यांना कामगारविषयक कायदे तर तयार करावे लागलेच पण संपाचा पुकारा करणाऱ्या कामगारांची समजूत घालण्यासाठी मजूर मंत्र्यांबरोबर ठिकठिकाणी दौरेही करावे लागले. त्याशिवाय त्यांना पक्षाचे मुखपत्र संपादित करणे, तसेच पक्ष संघटना उभारणे, यातही मदत करावी लागली. समाजवादी पक्षाच्या कार्यामुळे सरकारचा सामाजिक पाया जसा बळावला तसाच व्यापकही झाला. सरकारच्या पाठीमागे जनशक्ती उभी राहिल्यामुळे परकीय आक्रमणाचा धोकाही टळला. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय परिस्थितीतील या समाधानकारक फेरबदलाबद्दल अध्यक्ष आणि सरकार यांनी रॉय यांना भरघोस श्रेय दिले.

रॉय हे अशा रीतीने समाजवादी पक्षाची बांधणी करीत असताना एक रहस्यमय प्रवासी मेक्सिको शहरात येऊन थडकला. हा प्रवासी रशियाच्या बोल्शेव्हिक पक्षाच्या पुढाऱ्यांपैकी एक, मायकेल बोरोदिन हा होता. तो एका गुप्त मोहिमेवर नव्या जगाकडे वळला होता. मॉस्कोने त्याला दक्षलक्ष रूबल्सचे राजघराण्याचे जडजवाहीर घेऊन अमेरिकेला पाठविले होते. ते विकून त्याची सारी प्राप्ती वॉशिंग्टनमधील व्यापारी केंद्राच्या व्यवस्थेसाठी तसेच अमेरिका खंडात कम्युनिस्ट आंदोलनाचा पाया घालण्यासाठी खर्च करण्याच्या त्याला सूचना देण्यात आल्या होत्या. बोरोदिनने आपल्या दोन सूटकेसीसच्या तळाला हे जडजवाहीर शिवून टाकले होते. प्रवासात या सूटकेसीस त्याने एका ऑस्ट्रियन लष्करी अधिकाऱ्याच्या हवाली केल्या होत्या. तो अधिकारी शिकागो येथे बोरोदिनच्या पत्नीच्या हाती त्या सूटकेसीस देणार होता. मध्येच काहीतरी विघ्न आल्यामुळे सदर अधिकाऱ्याला वर्षभर ही जबाबदारी पार पाडता आली नाही. त्यामुळे बोरोदिन न्यूयॉर्कमध्ये अडकून पडला. तथापि अटकेच्या भीतीमुळे त्याला न्यूयॉर्क सोडणे भागच होते. त्याने मेक्सिकोत आश्रय घ्यावयाचे ठरविले. बोरोदिन मेक्सिकोत आला तो नव्याने धारण केलेल्या एका नावाने. त्याच्यापाशी पैसेही नव्हते. मेक्सिको शहरात त्याला समाजवादी पक्ष व

त्याचा "हिंदू" सरचिटणीस यांची माहिती मिळाली. त्याने रॉय यांचा शोध घेतला व त्यांची भेट घेतली. रॉय या घ्यावयाचे ठरविले. बोरोदिन मेक्सिकोत आला तो नव्याने धारण केलेल्या एका नावाने. त्याच्यापाशी पैसेही नव्हते. मेक्सिको शहरात त्याला समाजवादी पक्ष व त्याना "हिंदू" सरचिटणीस यांची माहिती मिळाली. त्याने रॉय यांचा शोध घेतला व त्यांची भेट घेतली. रॉय यांच्या राजकीय जीवनाच्या दृष्टीने ही भेट विलक्षण महत्वाची ठरली.

बोरोदिन ज्या कठीण पेचात सापडला होता, त्याची जाणीव ठेवून रॉय यांनी त्याला आपल्या घरीच रहावयास बोलाविले. त्याची जी आर्थिक चिंता होती, रॉय यांनी दूर केली. त्यांनी शिकागो येथे बोरोदिनच्या पत्नीला आणि वॉशिंग्टन्मधील रशियन व्यापारी केंद्राला पैसे पाठवून दिले. जर्मनांकडून मिळालेल्या द्रव्याचा त्यानी अशा रीतीने उपयोग केला. त्यानी लष्करी अधिकाऱ्यांचा आणि त्याच्या हवाली केलेल्या सूटकेसीसचा शोध घेण्याचीही व्यवस्था केली. हा शोध फलदायी ठरला नाही. पण अखेरीस त्या सूटकेसीस बोरोदिनच्या पत्नीच्या हाती पडल्या. दरम्यान बोरोदिन जेव्हा मॉस्कोला पोचला तेव्हा राजघराण्याच्या जडजवाहिराची अफरातफर केल्याचा त्याच्यावर आरोप ठेवण्यात आला. त्यात त्याला शिक्षाही झाली असती. पण रॉय यांच्या साक्षीने त्याच्यावरील सावट दूर झाले आणि त्याचा जीव बचावला. रॉय आपल्या आठवणीत या प्रकरणाचा उल्लेख करताना म्हणतात "क्रांतिकार्याला ही माझी दुसरी देणगी होती."

रॉय आणि बोरोदिन हे जिव्हाळ्याचे मित्र झाले. नंतर त्यानी मॉस्को व चीनमधे एकत्र काम केले. वेळोवेळी राजकीय प्रश्नांवर त्यांचे मतभेद झाले तरी रॉय यांचा कॉमिन्टर्नशी संबंध असेपर्यंत त्यांची मैत्री कायम राहिली. रॉय यांचे मतांतर बोरोदिन याने पुरे केले आणि कम्युनिझमचा रॉय यानी परिपूर्णपणे स्वीकार केला. बोरोदिन हा फार विद्वान् आणि सुसंस्कृत माणूस होता. आणि रॉय यांच्यासारखा उत्सुक विद्यार्थी त्याला मिळाला. रॉय यांनी त्याच्याकडून विरोध विकासवादी जडवादाची गुंतागुंत तर समजावून घेतलीच पण युरोपीय संस्कृतीचे श्रेष्ठत्व त्यांना पटवून देण्याचेही बोरोदिनने कार्य केले. कला आणि संस्कृती यांचे रसग्रहण करावयाला बोरोदिन यानेच त्यांना शिकविले. सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे जागतिक सामाजिक क्रांतीची आवश्यकता त्याने रॉय यांना पटवून दिली आणि ती संघटित करण्यासाठी कोणती धोरणे आणि डावपेच अमलात आणले पाहिजेत त्याचे त्याने रॉय यांना धडे दिले.

रॉय यांनी बोरोदिनची प्रेसिडेंट करांझा आणि सरकारातील इतर महत्वाचे लोक यांच्याशी ओळख करुन दिली. बोरोदिनने यांच्यावर छाप टाकली आणि

रॉय यांच्या पाठिंब्याने रशियन सरकार आणि कॉमिन्टर्न यांच्या कार्यासाठी बऱ्याच सवलती मिळविल्या. त्या दृष्टीने रॉय यांच्या मेक्सिकोतील प्रतिष्ठेच्या सहाय्याने बोल्शेव्हिकांनी नव्या जगात पाय रोवले असे म्हणता येईल. बोरोदिन याच्याकडे जे कार्य सोपविण्यात आले होते ते पुरे केले आणि त्याला ही पुरेपूर जाणीव होती की रॉय यांच्या पाठिंब्याशिवाय त्याला हे कार्य खास पुरे करता आले नसते.

रशियन राज्यक्रांतीची वार्ता सबंध जगभर पसरली होती व त्या वार्तेने अनेक देशातील वातावरण थरारून गेले होते. समाजवादी पक्षात अशी मागणी करण्यात येऊ लागली की पक्षाने रशियन क्रांतीला आपला पाठिंबा जाहीर करावा आणि क्रांतीनंतर जे कम्युनिस्ट इंटरनॅशनल स्थापन करण्यात आले होते त्याला आपला पक्ष जोडून घ्यावा. पक्षाच्या सरचिटणीसाचा पाहुणा म्हणून शहरामध्ये एक बोल्शेव्हिक दूत वावरत आहे या वार्तेचा स्फोट झाल्यानंतर तर या मागणीला निकराचा जोर चढला. एक सूचना अशी आली की समाजवादी पक्षाचे कम्युनिस्ट पक्षात रूपांतर करण्यासाठी एक खास अधिवेशन भरविण्यात यावे. काही आठवड्यानंतर हे अधिवेशन भरले. रॉय हे त्याचे अध्यक्ष होते. अधिवेशनाने पक्षाचे नाव बदलण्याचा निर्णय घेतला. तो कम्युनिस्ट पक्ष झाला. रशियाबाहेरचा जगातील पहिला कम्युनिस्ट पक्ष. कॉमिन्टर्नने तयार केलेला जाहीरनामा अधिवेशनाने मंजूर केला आणि पक्ष कम्युनिस्ट इंटरनॅशनलला जोडण्याचे पक्के केले. त्याचवेळी पुढील वर्षीच्या मध्याला मॉस्कोमध्ये जी दुसरी कॉमिन्टर्नची काँग्रेस भरणार होती तिच्यासाठी शिष्टमंडळ पाठविण्याचाही ठराव केला. प्रतिनिधींच्या नावांचा उल्लेख करण्यात आला नाही. पण त्यात रॉय हे एक असतील हे गृहीतच धरण्यात आले.

बोरोदिनने रॉय यांच्या मॉस्को भेटीसाठी भूमिका तयार केली होती. रॉय यांच्या कार्याचे अहवाल तो मॉस्कोला पाठवीत असे. त्याची ही इच्छा होती की रॉय यांनी दुसऱ्या काँग्रेसला हजर रहावे आणि रशियन क्रांतीच्या नेत्याना भेटावे. या आमंत्रणामुळे रॉय यांच्यापुढे कार्याची एक नवी संधी उभी राहिली. ही संधी म्हणजे आपल्या देशात क्रांती घडवून आणून आपली महनीयता प्रगट केलेल्या लोकांच्या सहवासात जागतिक क्रांतीसाठी कार्यतत्पर होणे. मन भारावून टाकणारी ही संधी होती. तथापि रॉय यांना त्या बाबतीत निर्णय घेणे सोपे नव्हते. मेक्सिकोने त्यांना उदारपणाने वागविले होते आणि त्यांचे आदरातिथ्यही चांगल्या रीतीने केले होते. भारतात जे कार्य ते करीत होते त्यापेक्षा अगदीच निराळ्या प्रकारचे राजकीय कार्य करण्याची मेक्सिकोने त्यांना संधी दिली होती. त्यांनी येथे पुष्कळ मित्रही केले होते आणि त्यांना ही जाणीव होती की मेक्सिकोतून जाण्याचा आपण निर्णय घेतला, तर

या मित्रांना दु:ख होईल. पण त्यांच्यापुढे एक आमिषही उभे होते. बोरोदिनने त्यांचे या गोष्टीकडे लक्ष वेधले होते की मॉस्को हे भारताच्या वाटेवर असून योग्य वेळ येताच भारतीय क्रांतीचे कार्य पुरे करण्यासाठी त्यांना मॉस्कोहून भारतात जाणे अधिक सुलभ होईल. भारतीय क्रांतीबद्दलची ही अपेक्षा पुढे उभी होताच रॉय यांच्या मनाने उचल खाल्ली आणि मेक्सिको सोडण्याचा त्यांनी निर्णय घेतला. पण अखेरचा निर्णय घेण्यापूर्वी मात्र त्यांनी प्रेसिडेंट करांझा व इतर मित्रांचा सल्ला घेतला आणि त्यांची संमती मिळविली.

रॉय यानी 1919 सालच्या नोव्हेंबरमध्ये मेक्सिको सोडले. राजनैतिक पारपत्र त्यांच्यासाठी तयार करण्यात आले होते. आणि युरोपीय देशातील मेक्सिकोच्या राजनैतिक अधिकाऱ्यांना, आवश्यक असलेली सर्व मदत देण्याचीही सूचना देण्यात आल्या होत्या. मेक्सिकोत त्यांच्याबरोबर असलेल्या ईव्हलिन रॉय याही त्यांच्याबरोबर मॉस्कोला गेल्या.

आपल्या आठवणीत रॉय यांनी मेक्सिकोने जो प्रेमाचा व आदरातिथ्यांचा त्यांच्यावर वर्षाव केला त्याबद्दल धन्यवाद दिले आहेत. त्याचवेळी त्या भूमीवरील अडीच वर्षाच्या वास्तव्यात आपल्यामध्ये जे बदल घडून आले त्याचेही त्यानी बोलक्या शब्दात वर्णन केले आहे. ते लिहितात : ''प्रयाणाचा माझा दिवस जवळ येऊ लागताच मी जे गमाविणार होतो, त्याबद्दलची प्रतिक्रिया तीव्रतर होऊ लागली. मेक्सिकोत मी अडीच वर्षेच होतो. पण मला वाटले जणू बाळपणापासूनच मी येथे राहात आहे. व्यक्तिगत असे फारसे मित्र मी केले नाहीत. मेक्सिकन लोकांचा भावाविष्कार परंपरेच्या संस्कारानी भारलेला असला तरी तो नेहमीच भोंदूपणाचा असतो असे नव्हे. पण त्याचा उस्फूर्तपणा माझ्या मानसिक प्रवृत्तींशी जुळणारा नसे. तथापि हा एक अत्यंत आतिथ्यशील देश आहे. येथील सरकार कल्पना करता येणार नाही इतके मैत्रीपूर्ण आहे आणि कृतज्ञेतेच्या भावनेने जी काही अल्पस्वल्प सेवा मी केली, तिची कदर कितीतरी पटींनी अधिक या सरकारने केली; इतकेच नव्हे तर येथील सुसंस्कृत व्यक्तींनी मला विलक्षण चांगुलपणाने, जवळीकीच्या भावनेने व प्रेमाने वागविले. याचे जे पुरावे मला प्रत्यक्षही आढळून आले, त्यानी मी भारावून गेल्याशिवाय राहिलो नाही. एकंदरीने हा समृध्द तसाच समाधान देणारा अनुभव होता. एका दृष्टीने मेक्सिको ही माझ्या नव-जन्माची साक्ष देणारी भूमी ठरली. एवढे खरे की तेथे जाण्यापूर्वी माझ्या पूर्वजीवनातील कल्पना आणि ध्येये यांच्याबद्दल मला असंतोष वाटू लागला होता. परंतु मेक्सिकोतील माझ्या वास्तव्यात माझे नवे ध्येयस्वप्न अधिक स्पष्ट झाले आणि निष्फळ वाटणाऱ्या असंतोषाची जागा एक प्रकारच्या नव्या निष्ठेने घेतली की जी मला उज्वलतर भविष्याच्या दिशेने घेऊन जाऊ शकेल. हा एक फार मोठा

बदल होता. राजकीय कल्पना आणि क्रांतिकारक ध्येये यांच्यातील फेरबदलापेक्षाही अधिक मोठा. मी जीवनाचा एक नवा दृष्टिकोनच संपादन केला. माझ्या मनात एक क्रांती घडून येत होती - तत्वज्ञानात्मक क्रांती, जिला मर्यादाच नव्हत्या. जीवनाच्या दृष्टिकोनातील मूलभूत फेरबदलामुळे पुनर्जन्म देणाऱ्या या भूमीबद्दलच्या भावनात्मक आत्मीयतेवर मात करणे मला शक्य झाले.''[6] रॉय पुढे म्हणतात ''पुनर्जन्माची साक्ष देणाऱ्या या भूमीचा मी त्याग केला तो बौध्दिक दृष्ट्या विमुक्त झालेला - पण नव्या श्रध्देचे पाठबळ घेऊन जगणारा एक माणूस म्हणून. तथापि त्या श्रध्देतील तत्वज्ञानात्मक बैठक हीच खरी चैतन्यदायी शक्ती होती. आर्थिक स्वातंत्र्य आणि सामाजिक न्याय यांचा आशय नसलेल्या राजकीय स्वातंत्र्यावर माझा आता विश्वास उरला नव्हता. पण मला हीही जाणीव झाली होती की बौध्दिक स्वातंत्र्य म्हणजे सर्व परंपरा आणि अधिसत्ता यांच्या बंधनातून मुक्तता - हे सामाजिक विमुक्तीसाठी परिणामकारक संघर्ष करण्याचे एकमेव साधन होते.''[7]

## टीपा

1. केर जेम्स कॅम्पबेल. *पोलिटिकल ट्रबल इन इंडिया 1907-1917*, भारतीय आवृत्ती, कलकत्ता, 1973. पृ. 258.
2. मेमुआंज. पृ. 23.
3. हॅथकॉक्स, जॉन पॅट्रिक. *कम्युनिझम अँड नॅशलिझम इन इंडिया*, प्रिन्स्टन युनिव्हर्सिटी प्रेस, प्रिन्स्टन, 1971 पृ. 8.
4. मेमुआज, पृ. 43.
5. *कित्ता*, पृ. 199.
6. *कित्ता*, पृ. 217.
7. *कित्ता*, पृ. 219.

# कॉमिन्टर्नच्या छत्राखाली

मॉस्कोचा प्रवास ही रॉय यांच्या दृष्टीने एक तीर्थयात्रा होती. ते आता परिपूर्ण श्रध्दावान् कम्युनिस्ट बनले होते आणि मॉस्को हे जागतिक क्रांतीचे मार्गदर्शक केंद्र म्हणूनही त्यांनी त्याचा स्वीकार केला होता. या क्रांतीसाठी आपले जीवन पणाला लावण्याचाही त्यानी निर्धार केला होता. भारतातील क्रांतीसाठी कार्य करण्याला ते अतिशय उत्सुक होते. पण मॉस्को येथील जागतिक क्रांतीच्या केंद्राच्या मार्गदर्शनाखाली हे कार्य अधिक परिणामकारक रीतीने करता येईल, अशी त्यांना आशा वाटत होती. ते मॉस्कोला जात होते ते जागतिक क्रांतीच्या सैन्यदलात एक सैनिक म्हणून स्वतःला सामील करून घेण्यासाठी. पहिल्या महायुध्दाचा शेवट होऊन रशियातील क्रांती यशस्वी झाल्यानंतरच्या पहिल्या काही वर्षांच्या काळात रशियाकडे आकर्षित होणारे आणि क्रांतीच्या त्या पवित्र भूमीच्या सेवेसाठी स्वतःला अर्पण करू पाहाणारे रॉय हे काही एकटेच क्रांतिकारक नव्हते. सामाजिक क्रांतीसाठी आपले सर्वस्व पणाला लावलेल्या शेकडो उदात्त वीरांनाही तोच ध्यास लागून ते मॉस्कोकडे वेगाने धावले होते. तेथे त्यानी जे पाहिले आणि विशेषतः नंतरच्या काळात तेथे ज्या घडामोडी झाल्या त्यामुळे अनेकांच्या मनात निराशा निर्माण झाली आणि कम्युनिस्ट आंदोलनाच्या ते बाहेर पडले. रॉय हेही निराश झाले आणि कम्युनिस्टांचा सहवास त्यांनी सोडला. पण ते घडले फार उशीराने - काही दशके उलटल्यानंतर.

त्या काळात रशियाला जाणे किंवा युरोपमधे सुध्दा एका देशातून दुसऱ्या देशात प्रवास करणे सोपे नव्हते. युध्दकाळातील बरीच बंधने अद्यापही कायम होती. कॉमिन्टर्नच्या (कम्युनिस्ट इंटरनॅशनल) दुसऱ्या कॉंग्रेसच्या प्रतिनिधींच्या बाबतीत अशी व्यवस्था करण्यात आली होती की त्या सर्वांनी बर्लिनमधे जमावे आणि त्यानंतर मॉस्कोमध्ये त्यांना घेऊन जाण्यात येईल. त्याप्रमाणे रॉय हे 1919 सालच्या डिसेंबर महिन्यात बर्लिनला पोचले.[1] त्यापूर्वी ते स्पेनला उतरले होते आणि बोरादिनने दिलेल्या आदेशाप्रमाणे दुसऱ्या कॉंग्रेसला हजर रहाण्यासाठी समाजवादी, अराजकवादी व सिंडिकॅलिस्ट यांचे मन वळविण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता. कॉमिन्टर्नची स्थापना करणारी पहिली कॉंग्रेस मॉस्को येथे 1919 च्या एप्रिलमधे भरली होती. पण ती फारशी प्रातिनिधिक ठरली नव्हती. युरोपमधील समाजवादी गटातील फार

थोडे लोक तिला हजर राहिले होते. दुसरी काँग्रेस अधिक प्रातिनिधिक व्हावी, ही मॉस्कोची इच्छा होती. त्या दृष्टीने स्पेनमधील समाजवादी गटांचा पाठिंबा मिळविण्याचे काम रॉय यांच्याकडे सोपविण्यात आले होते.

रॉय यांची मॉस्कोला जाण्याची व्यवस्था होईपर्यंत चार महिन्यापेक्षा अधिक काळ त्यांना बर्लिनमध्ये काढावा लागला. तो काळ जर्मनीतील परिस्थिती पाहाण्यासाठी आणि समाजवादी व कम्युनिस्ट पक्षांच्या पुढाऱ्यांना भेटून त्यांच्याशी तात्विक व व्यावहारिक प्रश्नांवर चर्चा करण्यासाठी त्यांनी व्यतीत केला. रॉय बर्लिनला पोचण्यापूर्वीच कायसरच्या बादशाही राजवटीचे उच्चाटन झाले होते. काही महिने तेथे यादवी युध्द पेटले आणि अत्याचार व अराजकता यांचे थैमानही माजले. त्यानंतर सोशल डेमोक्रॅटिक पक्षाने सत्ता हाती घेतली. पण ती सत्ता निरंकुश नव्हती. रॉय यांच्या बर्लिनमधील वास्तव्यातच सैन्याने बंडाचा पुकारा केला. इतिहासात हे 'नॅप बंड' म्हणून ओळखले जाते. 1920 च्या मार्चमध्ये हे बंड झाले. सैन्यदलाच्या एका विभागाने बर्लिनमध्ये प्रवेश करून शहर ताब्यात घेतले. भीतीग्रस्त होऊन सरकारने पलायन केले. पण कामगारांनी परिस्थितीवर मात केली. त्यांनी एक सार्वत्रिक संप पुकारला. हा परिपूर्ण संप होता व त्याने साऱ्या शहराच्या नाड्या आखडून टाकल्या. त्या संपाला तोंड देता येत नाही म्हणून सैन्याने काढता पाय घेतला आणि सरकारचा बचाव झाला. रॉय यांनी सैन्य आत येत असलेले त्याचप्रमाणे बाहेर जात असलेले आपल्या हॉटेलमधील खोलीतून पाहिले. कामकरी वर्गाच्या ताकदीचे त्यांच्या समोर हे प्रात्यक्षिकच झाले.

जर्मनीतील सोशल डेमोक्रॅटिक पक्ष हा युरोप मधील सर्व समाजवादी पक्षांपैकी सर्वात चांगला संघटित पक्ष होता. त्या पक्षाला मजबूत आणि सुसंघटित अशा कामकरी चळवळीचा जोरदार पाठिंबा होता. त्याच्या नेतृत्वपदी बरेच अनुभवी आणि परिपक्व विचारवंत होते. ते सारे मार्क्सवादी होते. पण कार्ल मार्क्सच्या शिकवणुकीबद्दलची त्यांची चिकित्सा रशियामध्ये सत्ता काबीज केलेल्या बोल्शेव्हिकांपेक्षा वेगळी होती. मार्क्सवादी म्हणून, सामाजिक क्रांतीच्या अपरिहार्यतेवर त्यांचा विश्वास होता आणि कामगारांची मुक्तता आणि स्वातंत्र्य व समता यांची ग्वाही देणाऱ्या नव्या सामाजिक व्यवस्थेची प्रस्थापना हेच ध्येय त्यांनी मनोमनी जोपासले होते. समाजवादाकडे होणारी प्रगती अपरिहार्य पण हळूहळू होईल अशी त्यांची श्रध्दा होती आणि प्रक्षोभक कृती आणि सशस्त्र बंड यांचा आश्रय घेणे त्यांना पसंत नव्हते. सत्तेवर असताना त्यांनी देशाला समाजवादी दिशेने नेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांना प्रबळ शक्तींविरूध्द सामना द्यावा लागला. त्यापैकी एक शक्ती लष्करशहांची होती की जिला बादशाही राजवटीची पुनर्स्थापना करावयाची होती. दुसरी शक्ती कम्युनिस्ट व त्यांच्यासारख्या विचारसरणीच्या लोकांची होती की जिला

सर्व प्रस्थापित संस्था आणि हितसंबंध यांचे संपूर्ण उच्चाटन करून सक्तीने समाजवादाकडे देशाला न्यावयाचे होते. रॉय यांच्या वास्तव्याच्या काळात या सर्व शक्तींमध्ये तात्त्विक त्याचप्रमाणे व्यावहारिक पातळीवर ध्येयधोरण विषयक अशी अटीतटीची चर्चा होत होती. त्यांची सहानुभूती अर्थातच कम्युनिस्ट बाजूकडे होती. पण सर्व बाजूच्या लोकांचे ऐकून घेण्याची त्यांच्यामध्ये समतोल वृत्ती होती आणि त्यामुळे मेक्सिकोमध्ये मार्क्सवादाचे जे त्यांनी शिक्षण घेतले होते त्याचा सखोल विचार करण्याचा त्यांना अवसर प्राप्त झाला. समाजवादी नेत्यांच्या मानवतावादी प्रवृत्तींची त्यांच्या मनावर छाप पडल्यावाचून राहिली नाही. बर्लिनमधील वास्तव्यात त्यांनी त्यांच्यापैकी बऱ्याच पुढाऱ्यांची भेट घेतली. त्यापैकी प्रमुख म्हणजे बर्नस्टाइन, कॉट्स्की आणि हिल्फरडिंग हे होत.

रॉय यांची कम्युनिस्ट पुढाऱ्यांशी भेट काही दिवसानंतर झाली. कारण ते एकतर तुरूंगात किंवा भूमिगत होते. त्यांच्याशी संपर्क साधून देण्याचे ज्याच्याकडे काम सोपवून देण्यात आले होते त्यालाही पोलिसांनी अटक केली होती. तथापि लवकरच हा संपर्क साधला गेला आणि रॉय यांना जर्मनीच्या कम्युनिस्ट पक्षाच्या सर्व प्रमुख पुढाऱ्यांची भेट घेता आली. त्यांच्याशी रॉय यांनी मार्क्सवादाबद्दलच चर्चा केली नाही तर जर्मनी व इतर युरोपीय देशातील तत्कालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीबद्दलही त्यांनी विचारविनिमय केला. या चर्चेमुळे रॉय यांच्या ज्ञानाची क्षितिजे विस्तृत झाली आणि कम्युनिस्ट तत्वज्ञान व व्यवहार यांच्या बाबतीत त्यांच्या विचारांची बैठक अधिक पक्की झाली. जर्मन कम्युनिस्ट पुढाऱ्यात रॉय यांनी हाइनरिक ब्रॅन्डलर आणि ऑगस्ट थलहायमेर यांच्याशी गाढ मैत्री जमविली. ही व्यक्तिगत तशीच राजकीय मैत्री होती. हे तिघे कॉमिन्टर्नमध्ये तसेच त्याच्या बाहेर एकत्र राहिले.

1920 साली एप्रिल महिन्यात रॉय मॉस्कोला पोचले. त्यांची कीर्ती त्यांच्या आधीच पोचलेली होती. बोरोदिन त्यांच्या स्वागतासाठी हजर होता आणि तो स्वतः राहात होता तेथेच त्याने रॉय यांच्या राहण्याची व्यवस्था केली. त्याच संध्याकाळी त्यांची परराष्ट्रखात्याचे कोमिसार चिचेरीन आणि व्हाइस कोमिसार काराखान यांच्याशी ओळख करून देण्यात आली. दोघांनीही त्यांच्याशी भारतासहित पूर्वेकडील क्रांतिकारक कार्याबद्दल बोलणे केले. काही काळ कम्युनिस्ट गटात अशी आशा व्यक्त केली जात होती की भारतातील क्रांतिकारक कार्य अफगणिस्तानातील केंद्रातून संघटित करता येईल आणि त्या दृष्टीने रॉय यांना रशियाचे वकील म्हणून अफगणिस्तानात पाठविण्यात यावे अशीही सूचना करण्यात आली होती. त्या दिशेने प्रगती मात्र झाली नाही कारण थोड्याच दिवसात त्या देशातील राजकीय परिस्थितीत स्थित्यंतरे झाली आणि राजे अमानुल्ला जे काही काळ ब्रिटिश विरोधी होते ते ब्रिटिशांच्या बाजूचे झाले. त्याचा परिणाम म्हणून ज्या भारतीय क्रांतिकारकांनी काबूलमधे

आश्रय घेतला होता त्यांना देश सोडून जावयाला सांगण्यात आले. या सर्व घटना लगेच नव्हे, पण कालांतराने घडून आल्या. पण कॉमिन्टर्नला काबूलमधून सूत्रे हलविण्याची योजना सोडून द्यावी लागली. त्यांनी पूर्वेकडील कार्यासाठी रॉय यांच्या सेवेचा उपयोग करून घेण्याची योजना मात्र सोडून दिली नाही. पण त्याबद्दल पुढे पाहू.

पुढील काही दिवसात रॉय हे लेनिन, झिनोव्हीव्ह, आणि ट्रॉट्स्की यांच्यासह कॉमिन्टर्नच्या सर्व प्रमुख नेत्यांना भेटले. स्तालिन त्यावेळी उच्च पदाला पोचलेला नव्हता आणि मॉस्कोमध्येही नव्हता. एक वर्षानंतर रॉय यांची स्तालिनशी भेट झाली. लेनिनशी भेट होण्यापूर्वी दुसऱ्या कॉंग्रेससाठी राष्ट्रीय व वसाहत विषयक प्रश्नावर लेनिनने जो प्रबंध तयार केला होता, त्याच्या मसुद्याची प्रत रॉय यांना देण्यात आली होती. त्या प्रतीच्या पहिल्या पानावर डाव्या कोपऱ्यात लिहिण्यात आले होते, ''कॉ.रॉय. चिकित्सेसाठी आणि सूचनांसाठी.'' रॉय यांना साहजिकच त्याचा अभिमान वाटला. त्यांनी स्वतःच ज्या लेनिनला 'त्या काळचा सर्वश्रेष्ठ पुरूष' म्हणून मानले होते, त्याने आपला विचार करावा आणि एका फार महत्त्वाच्या प्रश्नावर आपल्या सूचना मागवाव्या ही अभिमान वाटण्यासारखीच गोष्ट होती. रॉय त्याच दिवशी लेनिनला भेटले. लेनिनने त्यांना पाहाताच म्हटले ''तुम्ही किती तरूण आहात. मला वाटले होते की पूर्वेकडील एकाद्या सफेद दाढीच्या विद्वान व्यक्तीचे मला दर्शन होईल'' रॉय यांनी आपल्या आठवणीत या घटनेची नोंद केली आहे. लेनिनच्या पहिल्या भेटीचा हृदयस्पर्शी वृत्तांतही त्यांनी आपल्या 'आठवणीत' कथन केला आहे. त्या भेटीत लेनिनने रॉय यांच्या मेक्सिकोतील कार्याबद्दल प्रशस्तीचे उद्गार काढले आणि म्हटले की वसाहती आणि वसाहत सदृश देशातील कम्युनिस्ट कार्याची दिशा यातून स्पष्ट होऊ शकेल. या प्रश्नावरील प्रबंधाबद्दल त्यांनी रॉय यांचे मतही विचारले. रॉय यांनी तो प्रबंध वाचला नसल्यामुळे त्यांना काहीच मत प्रगट करता आले नाही. त्यानंतर रॉय यांच्या लेनिनशी अनेक भेटी झाल्या व त्या दोघांनीही अनेक प्रश्नांवर चर्चा केली.

कॉमिन्टर्नची दुसरी कॉंग्रेस 1920 साली 23 जुलै ते 7 ऑगस्ट पर्यंत भरली होती. कॉंग्रेसचे दर्शनी अधिवेशन लेनिनग्राडमध्ये भरविण्यात आले. त्यासाठी खास गाड्यांनी सर्व प्रतिनिधींना लेनिनग्राडला नेण्यात आले. रॉय व त्यांच्या पत्नी ईव्हलिन रॉय हे मेक्सिकन कम्युनिस्ट पक्षाचे प्रतिनिधी म्हणून हजर राहिले. भारताचे प्रतिनिधित्व अवनी मुकर्जी व बी.पी.टी. आचार्य या दोघांनी केले. तथापी व्यवहारतः रॉय हे भारताचे प्रतिनिधी म्हणूनच मानले गेले. त्यांनी त्याच अधिकारात कॉंग्रेसपुढे भाषण केले व निरनिराळ्या समित्यांवर त्याच अधिकारात त्यांची निवड करण्यात आली. पहिल्या खुल्या अधिवेशनात निरनिराळ्या कमिशन्सवर प्रतिनिधी निवडण्यात आले. रॉय यांची

त्यातील अत्यंत महत्वाच्या, म्हणजे राष्ट्रीय व वसाहत विषयक कमिशनवर निवड झाली.

राष्ट्रीय व वसाहत विषयक प्रश्नावरील लेनिनच्या प्रबंधाची चर्चा मुख्यतः वरील कमिशनमध्येच झाली. या प्रबंधातील काही भागाबद्दल रॉय यांचे लेनिनशी गंभीर मतभेद होते. राष्ट्रीय क्रांतिकारक संघर्षामध्ये राष्ट्रीय भांडवलदारांचा कोणता भाग राहील याविषयीच हा मतभेद होता. रॉय यांचे असे मत होते की राष्ट्रीय भांडवलदारांना फक्त काही सवलती व हक्क तेवढे संपादन करावयाचे आहेत. साम्राज्यशाहीचा विध्वंस करावयाला ते मदत करणार नाहीत. रॉय यांनी लेनिनशी चर्चा करतांना ही मते प्रदर्शित केली होती. पण खाजगी बैठकीत मतभेद व्यक्त करणे वेगळे आणि कमिशनच्या बैठकीत जाहीरपणे त्यांना वाचा फोडणे अगदीच वेगळे. शिवाय लेनिनसारख्या अद्वितीय नेत्याविरूध्द हे मत प्रदर्शित करू पाहणे याला जसे धैर्य लागते, त्याचप्रमाणे आपल्या मताबद्दलचा आग्रहही लागतो. रॉय यांनी कम्युनिस्ट नेत्यांच्या पहिल्याच आंतरराष्ट्रीय मेळाव्यात प्रत्यक्ष लेनिनशी तात्विक झटापट करताना हे धैर्य आणि धाडस दाखविले. लेनिन जसा दयाळू तसाच परमतसहिष्णू होता. त्याने रॉय यांना प्रतिस्पर्धी प्रबंध लिहिण्याची सूचना करून अक्षरशः चकित केले. रॉय यांनी प्रतिस्पर्धी नव्हे तर पूरक प्रबंध तयार करण्याला मान्यता दिली. त्यानंतर लेनिनने कमिशनला दोन्ही प्रबंध एकाचवेळी विचारात घेण्याचा आदेश दिला व त्याप्रमाणे विचारही करण्यात आला. पुढे कमिशनने रॉय यांच्या प्रबंधात काही सुधारणा केल्या; आणि लेनिनने आपल्या प्रबंधात 'भांडवलदारी लोकशाहीवादी' याच्या ऐवजी 'राष्ट्रीय क्रांतिकारक' असा शब्द प्रयोग करावयाला मान्यता दिली. दोन्ही प्रबंध नंतर मंजूर करण्यात आले. लेनिनचा मुख्य म्हणून आणि रॉय यांचा पूरक म्हणून.[2] कॉंग्रेसने कमिशनच्या शिफारशीनुसार एकाच पध्दतीने दोन्ही प्रबंधाना अधिकृत मान्यता दिली.

लेनिन आणि रॉय यांच्यामधील वाद, वसाहतीतील कम्युनिस्ट पक्षानी राष्ट्रीय भांडवलदार व त्यांच्या संघटना यांना कोणत्या प्रकारची मदत द्यावी यावर केंद्रित झाला होता. लेनिनने 'कामकरी आंदोलनाच्या स्वतंत्र अस्तित्वाची' ग्वाही देत ''भांडवलदारी लोकशाहीशी तात्पुरती तडजोड'' करण्याची शिफारस केली होती. रॉय यांनी आग्रहाने असे प्रतिपादन केले की कॉमिन्टर्नने आपले सारे लक्ष कामगार व शेतकरी यांची स्वतंत्र आंदोलने उभारण्यावर केंद्रित करावे. पण अशी आंदोलने अस्तित्वात नसली तर काय करावयाचे हा प्रश्न होता. परिपक्व विचारसरणीच्या लेनिनला ही कल्पना होती की राष्ट्रीय क्रांतिकारक आंदोलनाबरोबर संयुक्त कारवाई केल्यानेच या आंदोलनांचा उठाव होऊ शकेल. कम्युनिझमचे अगदी नवे उपासक असल्यामुळे रॉय यांच्या

भारतातील कामकरी आंदोलनाच्या ताकदीबद्दल व स्वतंत्र वृत्तीबद्दल बऱ्याच अवास्तव अपेक्षा होत्या. लेनिनशी त्यानंतर त्यांचा जो विचारविनिमय झाला त्यातून लेनिनने सुचविलेल्या धोरण व डावपेच यांच्या अचूकपणाबद्दल रॉय यांची खात्री पटली. काँग्रेसने दोन्ही प्रबंध मंजूर केल्यानंतर रॉय आणि लेनिन व कॉमिन्टर्नचे इतर नेते यांच्यामध्ये तत्वतः वा व्यवहाराच्या पातळीवर कोठलेही मतभेद राहिले नाहीत. भारतात कम्युनिझमचा विकास करण्यासाठी रॉय यांनी जे कार्य केले त्याला कॉमिन्टर्नकडून संपूर्ण मान्यता आणि पाठिंबा मिळाला. त्यानंतर 1928 साली मतभेद निर्माण झाले. परंतु त्याचे मुख्य कारण कॉमिन्टर्नने लेनिनचा प्रबंध झिडकारून टाकून अतिडाव्या साहसवादी भूमिकेचा आश्रय घेतला हे होय.

लेनिन आणि रॉय यांच्या प्रबंधांना मान्यता दिल्यामुळे वसाहती आणि वसाहत सदृश प्रदेश यातील राष्ट्रीय आणि कम्युनिस्ट शक्ती यांच्यामध्ये कोणत्या प्रकारचे सहकार्य असावे, हा प्रश्न कायमचा सोडविला गेला नाही. तो प्रश्न वेळोवेळी उफाळून वर येत असे आणि कॉमिन्टर्न काँग्रेसच्या अधिवेशनांना पुनःपुनः त्याचा विचार करावा लागत असे. खरे तर यावर एकदा अंतिम निर्णय घेणे अशक्यप्रायच झाले होते. त्या त्या देशातील प्रतिस्पर्धी शक्तींचे परस्पर संबंध यावर तो प्रश्न अवलंबून राहात असे. ते संबंध वारंवार बदलत आणि निरनिराळ्या देशात ते निरनिराळे राहात असत. चिनी क्रांतीच्या भिन्न अवस्थांमध्ये या दोन्ही प्रबंधांचा वारंवार उल्लेख केला जात असे. 1927 मेमध्ये स्तालिनने त्यांचा दोन वेळा उल्लेख केला आणि असे म्हटले की चीनमधील परिस्थितित लेनिनपेक्षा रॉय यांचा प्रबंधच अधिक सुसंगत ठरत आहे. हा वाद वेळोवेळी निघत असे आणि त्या बाबतीत अखेरचा निर्णय 1943 साली स्तालिनने कॉमिन्टर्नचेच विसर्जन करीपर्यंत घेतला गेला नाही. ''चीनमधील माझे अनुभव'' या आपल्या पुस्तकात रॉय यांनी म्हटले आहे : ''हा वाद निर्णायक रीतीने कधी निकालात काढलाच गेला नाही. मतैक्य मात्र सर्वसाधारण तत्वांवर असे झाले की कम्युनिस्ट इंटरनॅशनलने वसाहतीतील लोकांच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी होणाऱ्या आंदोलनाना पाठिंबा द्यावा; आणि वसाहतीतील जुलुमाखाली भरडल्या जाणाऱ्या व आर्थिक दृष्टीने पिळल्या जाणाऱ्या लोकांच्या क्रांतिकारक संघटनांमार्फत हा पाठिंबा दिला जाणे अधिक परिणामकारक ठरेल. राष्ट्रीय भांडवलदारांबद्दलचा दृष्टीकोन अशा रीतीने निश्चित ठरलाच नाही. त्याना पाठिंबा द्यावयाचा तो वसाहतीतील लोकांचे ते एक घटक आहेत म्हणून. पण कोणत्या पध्दतीने आणि किती प्रमाणात तो पाठिंबा द्यावयाचा हे प्रत्यक्ष अनुभव आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य लढ्यातील त्यांचे स्थान यांचा विचार करून ठरवावे लागेल.''[3]

दुसऱ्या कॉंग्रेसने कॉमिन्टर्नमधील रॉय यांचे स्थान पक्के केले. ते साधारण प्रतिनिधी म्हणून मॉस्कोला गेले. पण लेनिनशी त्यांचा जो वाद झाला आणि त्या वादात त्यांनी मार्क्सवादी तत्वज्ञान व धोरण यांच्या बाबतीतील जी परिपक्वता प्रगट केली आणि कॉंग्रेसमधील इतर चर्चेमध्ये जे प्रविण्य दाखविले त्यामुळे आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट आंदोलनातील एक महनीय पुढारी म्हणून त्यांचे स्थान प्रस्थापित झाले. ही एक हेवा वाटण्यासारखीच घटना होती आणि रॉय यांचा हा उत्कर्ष 1928 साली आकस्मिकपणे त्याला धक्का बसेपर्यंत वर्षानुवर्षे वाढतच गेला.

कॉंग्रेसच्या अखेरीस कॉमिन्टर्नच्या कार्यकारी मंडळावर रॉय यांची निवड झाली असती. त्यांनी तो सन्मान नाकारला. कारण कॉंग्रेसनंतर त्याना पूर्वेकडे जावयाचे होते ''कदाचित पुन्हा परत न येण्यासाठी.'' पूर्वेकडे, विशेषत: भारतात क्रांतीची ज्योत प्रज्वलित करण्याचे कार्य त्यांच्याकडे सोपविण्यात आले होते. ''जागतिक क्रांतीची दुसरी आघाडी'' ते उघडणार होते. हे कार्य त्यांच्या आवडीचे होते. त्यांनी ते उत्साहाने हाती घेतले.

आतापर्यंत रॉय यांची भारतातील क्रांतीबद्दलची कल्पना संपूर्णपणे बदलली होती. त्यांनी ही नवी कल्पना आपल्या आठवणीत खालीलप्रमाणे विशद केली आहे: ''माझ्या नव्या श्रध्देनुसार क्रांत्या या आवश्यकतेनुसार घडून येतात. कोणतीही व्यक्ती त्यासाठी अपरिहार्य नव्हे. या क्रांत्या नवीन सामाजिक शक्तींच्या कृतीतून परिणत होत असतात. या सामाजिक शक्तींची परिपक्वता ही क्रांतीच्या सज्जतेची परिस्थितिजन्य खूण होय. ती मूलभूत खूण मिळेपर्यंत सशस्त्र उठावाचा पुकारा करता कामा नये. कारण तो अपयशी ठरणे अपरिहार्य आहे. प्रस्थापित सत्तेला विरोधी उभ्या असणाऱ्या सामाजिक शक्तींना प्रथम राजकीय दृष्ट्या संघटित करून क्रांतीच्या फौजेमध्ये त्याना समाविष्ट करून घेतले पाहिजे. त्यानंतरच स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या सैनिकांना शस्त्रास्त्रांनी सज्ज करण्याचा प्रश्न निर्माण होईल.

''क्रांतीच्या आमच्या जुन्या कल्पनेत आम्ही घोड्यापुढे गाडी जुंपीत होतो. त्या कल्पनेत निर्णायक महत्व शस्त्रास्त्रांना देण्यात आले होते आणि जेव्हा ती संपादन करण्याची शक्यता निर्माण होताना दिसली, तेव्हा आम्ही समजलो की क्रांती आता दारी येऊन उभी आहे. आम्ही त्यावेळी शस्त्रास्त्रे धारण करणारी माणसे जमविण्याचा प्रश्नही विचारात घेतला नाही. भूमिगत पक्षातील सभासदांची संख्या ही क्रांतीची सुसज्ज फौज उभारण्याच्या दृष्टीने अगदीच क्षुल्लक होय.''[4]

रॉय यानी आता ''क्रांतीच्या फौजेची'' उभारणी करण्याची योजना हाती घेतली.

## टीपा

1. ही माहिती मेमुआंजवर आधारित आहे.
2. या दोन प्रबंधांच्या प्रतींसाठी पहा: *अधिकारी, जो. हिस्ट्री ऑफ कम्युनिस्ट पार्टी ऑफ इंडिया,* पृ. 178 ते 188 आणि पृ.198 ते 205.
3. रॉय, एम. एन. *माय एक्स्पिरिअन्सिस इन चायना,* रेनेसांस पब्लिशिंग कं. मुंबई, 1938 पृ. 28.
4. मेमुआंज, पृ. 23.

# भारतातील कम्युनिझम

दुसऱ्या काँग्रेसनंतर काही आठवड्यांच्या आत पूर्वेकडे क्रांतीचा प्रसार करण्याच्या बाबतीतील आपले कार्य करण्यासाठी रॉय ताश्कंदला गेले.[1] पूर्वेमध्ये भारताचाच नव्हे तर रशियाचा आशियाई भाग आणि तुर्कस्तान ते अफगाणिस्तान यांच्या दरम्यान पसरलेला मध्य आशियातील अफाट मुलूख यांचाही समावेश होत असे. आशियाई रशियासहित या सर्व विभागात त्यावेळी अस्वस्थ परिस्थिती होती. त्या अफाट प्रदेशात अत्यंत मागासलेल्या लोकांचे वास्तव्य असे. हे लोक मुख्यत: मुसलमान असून क्रांतीसाठी त्यांची जी निष्ठा संपादन करावयाची ती त्यांच्या धार्मिक भावना न दुखावताच करणे आवश्यक होते. क्रांतीने तुर्कस्थानचे प्रजासत्ताक प्रस्थापित केले होते. पण त्या राजवटीचा लोकांवरील प्रभाव दुर्बलच होता. तेथे अनेक भटक्या जमाती आणि त्यांचे नियंते अस्तित्वात होते आणि त्यांना नियंत्रणाखाली आणावयाचे होते. क्रांतीचे शत्रू, विशेषत: ब्रिटिश साम्राज्यवाद नव्या प्रजासत्ताकाविरूध्द त्यांना उठविण्यासाठी त्यांना भडकविण्याचा प्रयत्न करीत होता. त्यांना जी चिथावणी दिली जात होती त्यात बोल्शेव्हिक हे धर्मविरोधी व इस्लामचे शत्रू आहेत यावरच भर दिला जात असे.

रॉय हे ताश्कंदला जावयाला निघण्यापूर्वी त्यांना माली ब्यूरो म्हणून म्हणण्यात येणाऱ्या लहानशा ब्यूरोमध्ये सभासद म्हणून नियुक्त करण्यात आले. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाने हा ब्यूरो प्रस्थापित केला होता. त्यांना सेंट्रल एशियाटिक ब्यूरोवरही नियुक्त करण्यात आले. सरकार आणि पक्ष यात प्रमुख असलेले सोकोलनिकॉव्ह व सॅफारॉव्ह हेही त्या ब्यूरोचे सभासद होते. ते आधीच तुर्कस्थानमध्ये येऊन पोचले होते. पण ते दोघेही इतर कामात गर्क असल्यामुळे ब्यूरोच्या कामाची मुख्य जबाबदारी रॉय यांच्यावरच पडली.

रॉय ताश्कंदला जावयाला निघाले ते दोन गाड्या भरून साहित्य घेऊन. त्यात विविध प्रकारची शस्त्रास्त्रे तसेच विपुल द्रव्यही होते. रॉय निघण्यापूर्वीची योजना अफगाणिस्तानमध्ये एक तळ उभारण्याची होती. या तळावरून शस्त्रास्त्रे व द्रव्य यांच्या सहाय्याने टोळ्यांची मने जिंकून त्यांच्या तर्फे भारतातील क्रांतिकारक दलांशी संबंध जोडण्याचा विचार होता. पण अफगाणिस्तान सरकारकडून सहकार्य न मिळाल्यामुळे ही योजना सोडून द्यावी लागली. शस्त्रास्त्रे आणि

त्यांच्याबरोबर पाठविण्यात आलेले लष्करी अधिकारी यांचा मात्र ब्रिटिशांनी चिथावणी देऊन उठविलेली बंडे यांचा बीमोड करण्यासाठी त्याचप्रमाणे भारतीय मुहाजिराना लष्करी शिक्षण देण्यासाठी पुढे चांगला उपयोग झाला.

ताश्कंदमधील राहण्याची परिस्थिती अत्यंत बिकट होती. क्रांतीचा उठाव झाल्यानंतर झारचे अधिकारी आणि इतर उच्च वर्गीय रशियन तेथून पळून गेले होते. पण पळून जाण्यापूर्वी जेवढा काही विध्वंस करता येईल, तेवढा त्यांनी केला होता. बहुतेक इमारती राहण्यालायक नव्हत्या; कारण पाण्याचे नळ तोडून टाकण्यात आले होते. फर्निचर मोडून टाकण्यात आले होते आणि विजेच्या तारा उपटून टाकण्यात आल्या होत्या. रॉय यांना राहण्यासाठी व त्यांच्या कचेरीसाठी एक इमारत देण्यात आली होती. बुखाराच्या अमिराच्या मुख्य प्रतिनिधीचे ते निवासस्थान होते. पण रॉय राहावयाला आले, तेव्हा त्यात फर्निचरही नव्हते आणि बाकीच्या सुखसोयींचा तर पत्ताच नव्हता. गालिच्यांचा थर मात्र तेथे पडलेला होता. जळणाची फार टंचाई असल्यामुळे निवासस्थानात ऊब आणणेही शक्य नव्हते. अन्नाची तर वानवाच होती. ''जीवन अगदी असह्य होते'' अशी रॉय यांनी स्वत: त्याबद्दल नोंद केली आहे.

बोखारा आणि खिवा ही त्या विभागातील दोन संस्थाने होती. ब्रिटिश लष्कर सोव्हियट-विरोधी प्रचार करण्यासाठी त्या संस्थानांचा उपयोग करीत असे. क्रांतीनंतर रशियन सरकारने बोखाराचे अमीर व खिवाचे खान यांना स्वातंत्र्य बहाल केले. पण ते अद्यापही ब्रिटिशांच्या तालावरच नाचत असत. रॉय यांना त्या प्रश्नाला हात घालावा लागला. त्यांच्या मार्गातील मुख्य अडचण मुसलमानी जनतेच्या प्रबळ धार्मिक भावना या होत. त्यासाठी रॉय यांनी कुराण व इतर मुस्लिम धार्मिक ग्रंथांचा अभ्यास केला. लोकांच्या धार्मिक भावना दुखावल्या जाणार नाहीत याची काळजी घेऊन, ते इस्लाम समतेचा जो पुरस्कार करीत आला आहे त्याच्या पायावर क्रांतीचे समर्थन करू लागले. त्यातून लोकांच्या संशयाचे निराकरण झाले. अमीर आणि खान यांना लष्करी उपाययोजनातून काबूत आणण्यात आले आणि क्रांतीची बुखारा व खिवा यात प्रस्थापना झाली.

याच सुमारास वार्ता आली, की बरेच भारतीय त्या विभागात आले असून खिलाफतसाठी लढण्याकरिता तुर्कस्थानला जाण्याची त्यांची इच्छा आहे. ते सर्व मुहाजिर होते, ज्यांनी आपल्या धार्मिक पुढाऱ्यांच्या आवाहनाला साद देऊन त्याचप्रमाणे खिलाफत आंदोलनाच्या आदेशांचे पालन करून भारत सोडला होता. त्यांची संख्या तीस ते पन्नास हजारांच्या दरम्यान मोजली जात होती. त्यांच्यापैकी कित्येकाना तुर्कोमान बंडखोरानी ताब्यात घेतले आणि त्यांचा खूपच छळ केला. बोखारामध्ये त्यांची वार्ता कळताच रॉय यांनी लाल सैन्याची एक पलटण त्यांना सोडवून घेण्यासाठी पाठविली. सुटकेनंतर

त्यांना बोखारा येथे नेण्यात आले. तेथे रॉय यांनी त्यांच्याशी बोलणे केले. त्यांच्यापैकी बहुतेक सर्व ज्वलज्जहाल धर्मवेडे होते आणि तुर्कस्तानला जाण्यासाठी ते तळमळत होते. त्यांच्यामध्ये काही सुशिक्षितही होते. रॉय यांनी लष्करी शिक्षणाचे जे आमिष त्यांच्यापुढे उभे केले, त्यांना आकर्षक वाटले आणि ते त्यांच्याबरोबर ताश्कंदला जावयाला तयार झाले. ते सुमारे पन्नास जण असतील.

ताश्कंदमध्ये रॉय यांना त्यांच्याबरोबर गेलेल्या मुहाजिरांच्या राहण्याची व खाण्याची व्यवस्था करावी लागली. ते ज्या ठिकाणी राहिले ते 'इंडिया हाऊस' म्हणून ओळखले जाऊ लागले. रॉय यांना त्यांच्यासाठी एक लष्करी प्रशिक्षण शाळा व राजकीय शिक्षण देणारी शाळाही काढावी लागली. रॉय यांनी जी सामुग्री आपल्याबरोबर नेली होती तिच्या सहाय्याने लष्करी शाळा सुरू करण्यात आली. सामुग्रीबरोबर जे रशियन अधिकारी गेले होते त्यांनी प्रशिक्षणाचे कार्य हाती घेतले. ही शाळा ब्रिटिश सरकारने तिला कडवा विरोध केल्यामुळे बंद करावी लागली. 1921 च्या मार्च महिन्यात ब्रिटन व रशिया यांच्या दरम्यान जो व्यापार विषयक करार झाला होता; त्यातून निर्माण झालेले संबंध तुटले जाऊ नयेत म्हणून रशियन सरकारला या विरोधाची दखल घ्यावी लागली. ही शाळा ऑक्टोबर 1920 ते मे 1921 पर्यंत चालू राहिली. ही राजकीय प्रशिक्षण शाळा भारतात त्यानंतर जी कम्युनिस्ट चळवळ वाढीस लागली, तिच्या संदर्भात अधिक वैशिष्ट्यपूर्ण मानावी लागेल. तिने कम्युनिस्ट चळवळीला बरेचसे क्रियाशील कार्यकर्ते दिले.त्यातील प्रमुख, शौकत उस्मानी, रफीक अहमद, अकबर शाह, फझल इलाही कुरबान, अबदुल मजीद आणि फिरोझउद्दीन मन्सूर हे होत. त्यांच्यापैकी बहुतेकांना ते भारतात परत गेल्याबरोबर पकडण्यात आले आणि पेशावर कम्युनिस्ट कटाच्या खटल्यात त्यांना गोवण्यात येऊन दीर्घ कारावासाच्या शिक्षा त्यांना देण्यात आल्या. सुटकेनंतर त्यांनी कम्युनिस्ट पक्षात प्रवेश केला. शौकत उस्मानी हे कानपूर आणि मीरत कटाच्या खटल्यातही गोवले गेले.

दुसरी जी महत्वाची घटना ताश्कंदमध्ये घडली ती भारतीय कम्युनिस्ट पक्षाची स्थापना ही होय. 1920 सालच्या ऑक्टोबरमध्ये ही स्थापना झाली. देशामध्ये फारशी कम्युनिस्ट चळवळ नसताना देशाबाहेर कम्युनिस्ट पक्ष स्थापन करणे, रॉय यांना पसंत नव्हते. पण आपल्या सहकाऱ्यांच्या आग्रहाखातर त्यांना होकार द्यावा लागला. सात सभासदांसह पक्ष सुरू झाला. पक्षाचे ठाणे मॉस्को येथे हलविण्यात आल्यानंतर आणखी काही लोकांची भरती करण्यात आली. भारतामध्ये कम्युनिस्ट पक्षाची स्थापना करण्यात आल्यानंतर हा पक्ष त्याचे परराष्ट्र केंद्र झाले. पण रॉय सोडले तर या पक्षाला कधी वैशिष्टय प्राप्त झालेच नाही.

1920 च्या सुरूवातीला रॉय यांना मॉस्कोला परतावे लागले. बर्लिनमधील भारतीय क्रांतिकारकांचे एक बरेच मोठे शिष्टमंडळ मॉस्कोला येणार होते. या शिष्टमंडळाची अशी मागणी होती की कॉमिन्टर्नने आपल्याला मान्यता द्यावी आणि भारतीय क्रांतीसाठी जे काही साहाय्य द्यावयाचे असेल, ते केवळ आपल्या केंद्रामार्फतच पाठविले जावे. या शिष्टमंडळाचे नेतृत्व सरोजिनी नायडू यांचे बंधू वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांच्याकडे होते आणि त्यात भूपेंद्रनाथ दत्त, डॉ. खानखोजे वगैरेंचा समावेश झालेला होता. शिष्टमंडळाने रॉय यांच्या प्रतिनिधिक स्वरूपालाच विरोध केला होता. त्यावर रॉय यांनी एवढेच उत्तर दिले की आपण कोणाचेही प्रतिनिधित्व करीत असल्याचा दावा कधीच केलेला नाही. त्यांनी प्रांजलपणे सांगितले की प्रतिनिधीमंडळाने कॉमिन्टर्नचे नेतृत्व मान्य केले व आपले मुख्य ठाणे मॉस्कोला हलविले तर त्यांच्याबरोबर कार्य करण्याला आपली कोणतीच हरकत नाही. शिष्टमंडळ दोन महिन्यांपेक्षा अधिक काळ मॉस्कोमध्ये होते आणि कॉमिन्टर्नच्या बऱ्याच पुढाऱ्यांच्या त्यांनी भेटीगाठी घेतल्या. पण त्या बोलण्यातून काहीच निष्पन्न झाले नाही. कारण त्यांची भूमिका निखालस राष्ट्रवादी होती. रॉय यांच्या कॉमिन्टर्नमधील प्रतिष्ठेला त्यांच्या विरोधामुळे धक्का बसलाच नाही.

या सुमारास मॉस्कोमध्ये ही जाणीव होऊ लागली की रॉय यांना ताश्कंदमध्ये ठेवण्यात काहीच अर्थ उरला नव्हता. कारण अफगाणिस्तानकडून विरोध होऊ लागल्यानंतर वायव्य सरहद्दीकडून भारतात जाणे शक्य होणार नव्हते. रॉय यांना मॉस्कोत बोलाविण्यात आले, ताश्कंदमधील शाळा व केंद्र बंद करण्यात आले आणि भारतातील कार्य मॉस्कोमधून त्यांनी करावे, अशी सूचना त्यांना देण्यात आली. नंतर त्यांचे मुख्य ठाणे बर्लिनमध्ये हलविण्यात आले. कारण तेथून भारताशी संबंध जुळविणे व वाढविणे अधिक सुलभ होईल अशी मॉस्कोमध्ये जाणीव झाली. हे सर्व निर्णय रॉय यांच्या पूर्ण संमतीनेच घेण्यात आले.

रॉय यांनी मॉस्कोमधील वास्तव्याचा उपयोग आपले अत्यंत महत्वाचे पुस्तक 'इंडिया इन ट्रँझिशन' हे लिहिण्यात खर्च केला. हे ऐतिहासिक महत्वाचे पुस्तक आहे. भारतातील परिस्थितीची मार्क्सवादी दृष्टिकोनातून चिकित्सा करण्याचा हा पहिलाच प्रयत्न होता. ते पुस्तक इंग्रजीत लिहिण्यात आले. पण त्यांची लगेच रशियन, जर्मन आणि इतर अनेक भाषांमधून भाषांतरे करण्यात आली. त्या पुस्तकाची युरोप आणि अमेरिकेत पुष्कळ विक्री झाली. त्या पुस्तकाच्या प्रवेशाला भारतात मात्र बंदी करण्यात आली. त्याच्या बऱ्याच प्रती चोरट्या मार्गाने भारतात आल्या आणि बुध्दिवंतांनी त्या पुस्तकाचे मोठ्या उत्साहाने वाचन केले. भारतातील तरुण मंडळी गांधीवादाकडून समाजवाद व कम्युनिझमकडे झुकताना, अंधारात चाचपडल्यासारखे करीत असताना या

पुस्तकाने त्यांना विचार प्रवर्तक खाद्य पुरविले. भारतातील कम्युनिस्ट चळवळीच्या विकासावर या पुस्तकाने चांगलीच छाप टाकली. दुसऱ्या काँग्रेसमध्ये लेनिनशी वाद घालताना रॉय यांनी जो दृष्टिकोन मांडला होता, त्याचे त्यांनी ऐतिहासिक व आकडेविषयक साहित्य देऊन या पुस्तकातून अधिक चिकित्सापूर्ण रीतीने दिग्दर्शन केले होते. रॉय यांनी आपल्या दृष्टीसमोर जी एक कल्पना ठेवली होती, ती एका प्रचंड साहित्यकृतीची. हे पुस्तक तिचा एक भाग होता. ब्रिटिश साम्राज्यशाहीचा ऱ्हास आणि अध:पात याबद्दल त्यांना एक ग्रंथ लिहावयाचा होता. त्या ग्रंथाचे बरेचसे साहित्य त्यांनी गोळा केले होते व सुरक्षितपणे ते जतन केले जावे म्हणून बर्लिनमधील एका प्रकाशकाकडे त्यांनी ते ठेवले होते. हिटलरच्या विध्वंसक मोहिमेत ते नष्ट झाले. रॉय यांना भारतीय लोकांचा वेदपूर्वकाळापासून आधुनिक काळापर्यंत सामाजिक इतिहासही लिहावयाचा होता. आर्य लोक आणि हिंदू संस्कृतीची वैशिष्ट्ये यांच्याबद्दल त्यांच्या काही अपूर्व कल्पना होत्या. राजकारणात व्यग्र झाल्यामुळे त्यांना जी पुस्तके लिहावयाची होती, ती ते लिहू शकले नाहीत, हे एक दुर्दैवच होय.

भारतासाठीच्या त्यांच्या कामाचे स्वरूप आता नियतकालिकात लेख लिहिणे, जाहीरनामे काढणे आणि असंख्य लोकांना व्यक्तिगत पत्रे लिहिणे या प्रकारचे झाले. कॉमिन्टर्नचे मुखपत्र 'इनप्रेकॉर' यात ते लेख लिहीतच होते. 1922 साली त्यांनी आपले स्वत:चे 'व्हॅनगार्ड' हे नियतकालिक सुरू केले. पोलिसांच्या जाळ्यात सापडू नये म्हणून त्याचे नाव वेळोवेळी बदलले जात असे. प्रकाशन स्थळही अनेक वेळा त्यांना बदलावे लागले. युरोपमध्ये सुध्दा पोलिसांच्या पाळतीतून ते मुक्त झाले नव्हते. एकदा जर्मनीतून हद्दपार करण्यात आले, तेव्हा त्यांना फ्रान्समध्ये आश्रय घ्यावा लागला. फ्रान्समध्येही त्यांचे फारकाळ स्वागत होऊ शकत नव्हते. तोही देश सोडावा लागून त्यांना पुन्हा जर्मनीत परत यावे लागले. सुदैवाने यावेळी त्यांना जर्मनीत राहू दिले गेले. इंग्लड अर्थातच त्यांच्या कक्षेबाहेरचे होते. कारण जुन्या क्रांतिकारक कृतींबद्दल त्यांच्यावर जी वॉरंटे काढण्यात आली होती ती अद्यापही उपयोगात आणली जाऊ शकत होती. वेळोवेळी रॉय यांनी जाहीरनामे काढण्याचे काम चालू ठेवले. त्यांच्या जोडीला खुली पत्रेही ते प्रसिध्द करीत असत. पण त्याहीपेक्षा महत्वाची होती ती क्रांतिकारक आंदोलनातील सहकाऱ्यांना, कामकरी संघातील व शेतकरी संघटनेतील कार्यकर्त्यांना आणि महत्वाच्या व्यक्तींना ते लिहीत असलेली पत्रे. या पत्रांतून जनतेच्या आशा आकांक्षांना सहानुभूती दाखविणारी मते रॉय व्यक्त करीत असत. त्यापैकी अनेक पत्रे पोलिसांच्या हाती पडली. त्यांच्या नकला करून घेतल्यानंतर पोलिस ती पत्रे ज्यांना उद्देशून ती लिहिली जात होती त्यांच्याकडे पोचती करीत असत. त्यापैकी काही नंतर कटाच्या खटल्यात पुराव्यानिमित्त सादर करण्यात आली.

इंडियन नॅशनल कॉंग्रेसला उद्देशून जे जाहीरनामे रॉय यांनी वेळोवेळी काढले त्यांची सुरूवात 1921 सालच्या डिसेंबरमध्ये अहमदाबाद येथे भरलेल्या अधिवेशनापासून झाली. असेच जाहीरनामे गया, गोहाटी, काकिनाडा, आणि बेळगाव येथील अधिवेशनांना पाठविण्यात आले. त्यापैकी अधिक महत्वाचा म्हणजे सी. आर. दास यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या गया अधिवेशनाचा जाहीरनामा होय. दास यांच्या काही वक्तव्यांमुळे रॉय यांच्या मनात फार मोठ्या आशा निर्माण झाल्या होत्या. असहकारितेची चळवळ कोसळून पडल्यानंतर दास हे जनआंदोलनाच्या दिशेने कॉंग्रेसच्या राजकारणाला वळण देतील अशी त्यांची अपेक्षा होती. रॉय यांनी त्या दृष्टीने एक निश्चित योजनाही आखून दिली होती. ती योजना कार्यवाहीत आणली जाईल अशी रॉय यांची अपेक्षा होती. पण अगदी त्याच्या उलट घडले आणि कॉंग्रेस राज्यघटनात्मक प्रपंचातच गुरफुटली गेली. रॉय हे देशात त्या वर्षात झालेल्या घडामोडींबद्दल परिपूर्ण माहिती करून घेत असत आणि मग आपल्या जाहीरनाम्यात योग्य ते बदल करीत असत. तथापि त्यांच्या विचारांची दिशा साधारणपणे तीच असे. या जाहीरनाम्यातून रॉय हे कॉंग्रेसच्या सर्वसाधारण सभासदाना आवाहन करीत असत की त्यांनी जनतेच्या मागण्यांकडे लक्ष पुरविले पाहिजे. त्यात हाही इषारा असे की जनतेला ज्या स्वातंत्र्याची तळमळ लागलेली आहे ते खादी आणि चरखा यांच्यासारख्या विधायक कार्यक्रमातून मिळणार नाही किंवा कौन्सिल प्रवेशातूनही मिळणार नाही. रॉय हे कॉंग्रेसजनांना निक्षून सांगत असत की नवे नेतृत्व त्यांना निर्माण करावेच लागेल. कॉंग्रेस हा भांडवलदारांचा पक्ष आहे असे रॉय यांनी कधीच मानले नाही. कॉंग्रेस हे एक जनआंदोलन आहे. ज्याच्यामधे शक्तिशाली होण्याची चिन्हे आहेत पण प्रतिगामी नेतृत्वामुळे ते कुंठित होत आहे, असे रॉय यांचे मत होते. ते नेतृत्व झुगारून दिले जावे आणि क्रांतिकारी नेतृत्वाने त्यांची जागा घ्यावी ही रॉय यांची इच्छा होती. कॉंग्रेसबद्दल त्यांनी जे जे लेखन केले त्यात हाच सदैव सूर असे. त्यांची ही खात्री होती की कॉंग्रेसवर प्रभुत्व संपादन करण्याच्या या प्रयत्नांना कामगार व शेतकऱ्यांच्या संघटनांची व त्यांच्या संघर्षाची जोड मिळाली, तर देशामध्ये कम्युनिस्ट पक्ष वाढीस लागेल.

रॉय यांनी पुस्तके, पत्रके आणि पत्रे यांच्या साहाय्याने जो तडाखेबंद प्रचार चालविला होता, त्यामुळे 1922 च्या सुमारास मुंबई, मद्रास, कलकत्ता, लाहोर आणि अलाहाबाद येथे लहानलहान कम्युनिस्ट गट अस्तित्वात आले. तोवर नलिनी गुप्ता, अवनी मुकर्जी, शौकत उस्मानी आणि चार्ल्स ॲशले यांच्यासारखे काही कम्युनिस्ट दूतही भारतात येऊन गेले होते. पण ते गट लहान होते आणि त्यांचा परस्परांशी संपर्क नसे. रॉय यांनी एकसूत्रीपणा आणण्याची त्यांना शिफारस केली आणि ज्याच्याआड दडून कार्य करता

येईल अशी कायदेशीर संघटना उभारण्याचीही कल्पना त्यांच्यापुढे मांडली. डांगे यांनी एकसूत्रीपणा आणणारे केंद्र बनावे अशी रॉय यांची इच्छा होती. पण डांगे यांनी ही सूचना मान्य केली नाही. चवथ्या कॉमिन्टर्नच्या कॉंग्रेसला आणि त्यानंतर कार्याची योजना आखण्यासाठी भरणाऱ्या खास परिषदेला त्यांनी हजर राहावे अशीही रॉय यांची इच्छा होती. त्यासाठी काही द्रव्यही पाठविण्यात आले. मुझफ्फर अहमद हे जावयाला तयार झाले. पण डांगे व सिंगारवेलू चेट्टियार यांना ही कल्पना पसंत पडली नाही. म्हणून ती योजना सोडून देण्यात आली.

तथापि गांधीवादाबद्दलचे वैफल्य पसरत चालले होते. स्वातंत्र्योत्सुक अशा ज्या युवकांनी हजारोंच्या संख्येने तुरूंगभरती केली होती, ज्यांना खादी व चरख्याचा पंथ अनाकर्षक वाटला त्यांचे डोळे चैतन्यपूर्ण कार्यक्रमाकडे लागलेले होते. कामगार आणि शेतकऱ्यांच्या पायावर सामुदायिक आंदोलन उभारण्याचा रॉय यांचा कार्यक्रम त्यांना चैतन्यमय वाटला होता. कम्युनिझमच्या ध्येयाकडेही ते आकर्षित झाले होते. पण रॉय हे दूर युरोपमध्ये होते आणि त्यांनी ज्यांच्याशी संबंध प्रस्थापित केला होता, अशा लोकांपैकी कोणीही तरुणांना नेतृत्व देण्यासाठी धैर्याने पुढे व्हावयाला तयार नव्हता. संधी चालून आली होती. पण तिचा उपयोग करण्यात आला नाही.

दरम्यान सरकार भारतातील कम्युनिस्टांच्या व रॉय आणि त्यांचे सहकारी त्यांच्या युरोपमधील चळवळींकडे कटाक्षाने लक्ष पुरवीत होते. सरकारला कळून आले की रॉय यांना असंतुष्ट कॉंग्रेसजन व त्यांचे जुने सहकारी, त्याचप्रमाणे काही वृत्तपत्रे यांच्याकडून वाढता प्रतिसाद मिळत आहे. सरकारला हेही कळले होते की फार मोठे कम्युनिस्ट आंदोलन देशात पेटण्याचा तात्काळ धोका नाही. पण कम्युनिझम देशात चांगले मूळ रोवण्याच्या आतच त्याच्यावर आघात करण्याचा सरकारने निर्णय घेतला. सरकारने त्यासाठी एक कटाचा खटला उभारण्याने ठरविले आणि कम्युनिस्ट चळवळीत पुढाकार घेत आहेत हे ठाऊक असलेल्या लोकांना पकडण्याचे सत्र सुरू केले. पहिली अटक शौकत उस्मानी यांची झाली.

त्यानंतर मुझफ्फर अहमद व नलिनी गुप्ता यांना पकडण्यात आले. डांगे यांना 1924 मार्च महिन्यात अटक झाली आणि कानपूर कम्युनिस्ट कटाचा खटला उभारण्यात आला. सिंगारवेलू चेट्टियार यांचे आरोपींमध्ये नाव होते. पण वृद्धपण आणि आजारीपण या कारणांसाठी त्यांना पकडण्यात आले नाही. कालांतराने त्यांच्यावरील आरोपही काढून घेण्यात आला त्याशिवाय रॉय आणि शर्मा पॉंडेचरीमध्ये, ब्रिटिश-भारतीय न्यायालयांच्या कक्षेबाहेर होते. रॉय हे कटाचे सूत्रधार मानले गेले होते. 1931 साली ते जेव्हा भारतात परतले तेव्हा या कटात भागीदार असल्याबद्दलची किंमत त्यांना मोजावी

लागली.त्यांच्यावर जो आरोप होता तो ब्रिटिश सम्राटाचे सार्वभौमत्व हिरावून घेण्यासाठी परस्परांमध्ये व कॉमिन्टर्नमध्ये एका कटाची त्यांनी उभारणी केली हा होय. या गुन्ह्यासाठी इंडियन पीनल कोडच्या 121 अ या कलमाखाली आरोपी शिक्षापात्र ठरतात. कॉमिन्टर्नचे ठराव व इतर घोषणा आणि आरोपी व रॉय यांच्यामधील पत्रव्यवहार हे कटाचे पुरावे म्हणून सादर करण्यात आले. न्यायालयाने आरोप सिध्द झाल्याचे ठरविले आणि आरोपीना प्रत्येकी चार चार वर्षांची सजा सुनावली.

आरोपीनी ज्या प्रकारचा बचाव सादर केला, तो रॉय यांना आवडला नाही. तो बचाव कायद्याच्या किचकट जंजाळात गुरफटून गेलेला, तांत्रिक आणि क्षमायाचना करणारा होता. सात वर्षानंतर जेव्हा त्याच आरोपाखाली त्यांच्यावर खटला भरण्यात आला तेव्हा निष्ठावंत कम्युनिस्टाने कोणत्या प्रकारचा धीरोदात्त राजकीय बचाव द्यावा आणि दिला पाहिजे, याचे उदाहरणच रॉय यांनी घालून दिले.

कानपूर खटल्याने देशातील कम्युनिस्ट कार्यावर जणू बोळाच फिरविला. रॉय यांना परत दळणवळण प्रस्थापित करण्यासाठी आणि कम्युनिस्टांच्या हालचालींना उत्तेजन देण्यासाठी व त्यांचे मार्गदर्शन करण्यासाठी काही काळ घालवावा लागला. ही पीछेहाट तात्पुरती होती, हे 1925 साली कानपूरमधेच कम्युनिस्ट पक्षाची स्थापना करण्यासाठी जी एक परिषद भरविण्यात आली तिच्यावरून सिध्द झाले. ही परिषद संघटित करणाऱ्या लोकांना एक कायदेशीर कम्युनिस्ट पक्ष स्थापन करावयाचा होता. पण कम्युनिस्टानी त्यांना बाजूला ठेवले आणि खराखुरा कम्युनिस्ट पक्ष स्थापन करण्यात त्यांनी यश मिळविले. रॉय यानी जणू आपले फार दिवसांचे स्वप्न साकार झाले असे समजून या पक्षस्थापनेचे स्वागत केले.

1925 साली भारतातील कम्युनिस्ट कार्याचे दिशा दिग्दर्शन करणाऱ्या यंत्रणेमध्ये बदल करण्यात आला. ते कार्य ग्रेट ब्रिटनच्या कम्युनिस्ट पक्षाकडे सोपविण्यात आले. हा कम्युनिस्ट पक्ष दैनंदिन कार्याचे संचलन करीत असे आणि रॉय हे एकंदरीने महत्वाच्या प्रश्नांवर मार्गदर्शन करीत असत. 'व्हॅनगार्ड' हे वृत्तपत्र प्रकाशित केले जात असे आणि रॉय यांचा भारतातील कम्युनिस्ट नेत्यांशी पत्रव्यवहार चालूच राहिला. त्या पत्रातून रॉय हे ध्येयधोरण व डावपेच यांच्याबद्दल चर्चा करीत असत. 1927 व 1928 या साली कामगार व शेतकरी यांचे जे पक्ष निघाले त्यांच्या कार्याबद्दलचा प्रश्न हा त्यातील महत्वाचा प्रश्न होता. या काळातील एक उल्लेखनीय पत्र हे सुप्रसिध्द असेंब्ली पत्र होय. 1928 साली केंद्रीय असेंब्लीत ते वाचून दाखविले गेल्यामुळे त्याला असेंब्ली पत्र म्हणण्यात येते. 1927 सालच्या पहिल्या आठ महिन्यात रॉय हे चीनमध्ये होते. त्यामुळे त्या काळात त्यांना भारतीय

कम्युनिस्टाना मार्गदर्शन करता आले नाही. सर्वसाधारणपणे ग्रेट ब्रिटनच्या कम्युनिस्ट पक्षाने दिग्दर्शित केलेले धोरण आणि रॉय यांचे धोरण यात फरक नव्हता. जागतिक व भारतातील परिस्थिती बद्दल दोघांचाही दृष्टिकोन समान होता हे रॉय यांच्या 'फ्यूचर ऑफ इंडियन पॉलिटिक्स' व पाम दत्त (पाम दत्त हे ग्रेट ब्रिटनच्या कम्युनिस्ट पक्षाचे बौध्दिक मार्गदर्शक होते) यांच्या 'मॉडर्न इंडिया' या पुस्तकांवरून दिसून येते.

त्यांच्यामधील मतभेद सहाव्या कॉमिन्टर्नच्या कॉंग्रेसनंतर प्रगट झाले आणि भारतातील कम्युनिस्ट पक्षाची उभारणी करण्यासाठी जे काही कार्य रॉय यांनी केले होते, ते उध्वस्त झालेले पाहाण्याचे रॉय यांच्या नशिबी आले. कॉंग्रेसला विरोध करण्याचे माथेफिरूपणाचे धोरण कॉमिन्टर्नने सुरू केल्यामुळे हा विध्वंस झाला. दुर्दैव असे की साम्राज्यशाही विरोधी सामुदायिक चळवळीचे कॉंग्रेस स्वरूप धारण करीत असतानाच या कॉंग्रेस विरोधी धोरणाचा पुरस्कार केला जाऊ लागला होता. त्या धोरणामुळे कॉमिन्टर्नपासून भिन्न मार्ग स्वीकारण्याची रॉय यांच्यावर पाळी आली. पुढील प्रकरणात या घटनेची चर्चा करण्यात येईल.

## टीपा

1. या प्रकरणाचा पहिला भाग 'मेमुआंज' वर आधारित आहे आणि नंतरचा भाग कायसतर सेसिल, भूतपूर्व संचालक, इंटेलिजन्स ब्युरो, आणि भारत सरकार यांच्या 'कम्युनिझम इन इंडिया' या पुस्तकावर आधारित आहे.

# चीनमधील कामगिरी

1927 च्या सुरूवातीला कॉमिन्टर्नने रॉय यांना आपला प्रतिनिधी म्हणून चीनला पाठविले. कॉमिन्टर्नने चीनमधील कार्याबद्दल जो एक नवा प्रबंध मंजूर केला होता त्याच्या अनुषंगाने कार्यावर देखरेख ठेवण्याचे रॉय यांच्याकडे काम सोपविण्यात आले होते. हा प्रबंध तयार करण्यात रॉय यांचा मोठा वाटा होता. नोव्हेंबर 1926 मध्ये मॉस्को येथे भरलेला कॉमिन्टर्नच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकीत तो मंजूर करण्यात आला.[1] या प्रबधाची मध्यवर्ती कल्पना अशी होती की चिनी क्रांती ही या पुढील काळात शेतकरी क्रांती म्हणूनच विकसित केली पाहिजे आणि कुओ मिंटांगशी बांधण्यात आलेल्या लाग्याबांध्याचा अवास्तव बडेजाव माजविण्यात येऊ नये.

कॉमिन्टर्न आणि रशियन सरकार चीनमधील घडामोडीत बराच काळ जिव्हाळ्याने लक्ष पुरवीत होते. रशियन सरकारला आस्था होती ती आपल्या साम्राज्यवादी विरोधकाना दुबळे करण्यात. या साम्राज्यवादी शक्तींनी आपल्या लष्करी हालचाली आणि प्रतिस्पर्धी युध्दखोर नेत्यांशी करण्यात येणारा व्यापार व त्यांना देण्यात येणारी मदत यांच्या जोरावर चीनवर प्रभुत्व प्रस्थापित केले होते. त्याच्या उलट रशियन सरकारने 1919 सालच्या जुलैमध्ये झारच्या सरकारने जे खास हक्क संपादन केले होते ते झुगारून दिले होते. त्या सरकारने, जी राष्ट्रवादी चळवळ देशामध्ये एकी निर्माण करून साम्राज्यवादी जुलूम आणि पिळवणूक यांच्यापासून देशाची मुक्तता करू पाहात होती, तिचे स्वागत केले होते व प्रत्यक्षपणे तिला सहाय्य दिले होते. कॉमिन्टर्नची चीनबद्दलची आस्था 1920 सालापासून सुरू झाली होती. एक दोन वर्षानंतर कुओमिंटांगची पुनर्रचना करण्यात आली व मॉस्कोच्या सल्ल्यानुसार कम्युनिस्टानी तीत प्रवेश केला. सुरूवातीला ट्रॉट्स्कीसहित सर्व रशियन नेत्यानी ही भूमिका मान्य केली. रॉय यांचाही तोच दृष्टिकोन होता.

कुओमिंटांगमध्ये प्रवेश केल्याचा कम्युनिस्टाना फार फायदा झाला, तो अशा रीतीने की कामगार व शेतकरी यांचा भरघोस पाठिंबा ते संपादन करू शकले. त्या पाठिंब्याच्या पायावर त्यांना सामुदायिक संघटनांत, सरकारमध्ये आणि सैन्यात महत्वाची पदे मिळविता आली.

1926 साली मात्र काही पेच निर्माण झाले. कुओमिंटांगमध्ये जमिनदार व भांडवलदार यांच्या हितसंबंधाचे जे लोक होते, त्यांच्यापैकी अनेक लोकांना

कम्युनिस्टांशी संबंध आवडत नव्हते. राष्ट्रवादी सैन्याचे सरसेनापती चियांग कै शेक हे कम्युनिस्टांचे विरोधक होते. त्यानी मार्च 1926 मध्ये कँटनला आणि एप्रिल 27 ला शांघायमध्ये कम्युनिस्टांविरूध्द बंड पुकारले आणि सत्ता सर्वस्वी काबीज केली. कालांतराने कुओमिंटांगमध्ये उजव्या व डाव्या गटात दुफळी पडली.

कम्युनिस्टांनी कुओमिंटांगमधील डाव्या गटाला पाठिंबा दिला. पण त्यांना काही वेळानंतर कळून आले की दोन्ही गटात फारच थोडा फरक आहे. कॉमिन्टर्न या घडामोडींकडे काळजीपूर्वक लक्ष देत होते. 1926 च्या नोव्हेंबरमध्ये भरविण्यात आलेल्या सभेत कॉमिन्टर्नने या घडामोडींचा विचार केला आणि तोवर जी भूमिका अमलात आणली जात होती तिच्यामध्ये बदल घडवून आणण्यासाठी रॉय यांना चीनमध्ये पाठविले. कॉमिन्टर्नने डाव्या कुओमिंटांगशी असलेली हातमिळवणी चालूच ठेवली पाहिजे, असा मात्र आग्रह धरला.

रॉय यांचा जुना मित्र बोरोदिन हा त्यावेळी चीनमध्ये होता. 1923 सालापासूनच त्याचा मुक्काम तेथे होता. चिनी कम्युनिस्ट पक्षाचा त्याचप्रमाणे राष्ट्रवादी सरकारचा तो मुख्य सल्लागार होता. त्याच्या बरोबर काही रशियन सल्लागारही होते. त्यात जनरल गॅलेन किंवा ब्लूशर यांचाही समावेश होता. बोरोदिनला कॉमिन्टर्नची नवी भूमिका आवडली नाही. त्यांचे या बाबतीत रॉय यांच्याशी गंभीर मतभेद होते आणि म्हणून त्या नव्या भूमिकेची अंमलबजावणी करण्याच्या बाबतीत त्यानी रॉय यांना मुळीच साहाय्य दिले नाही. बोरोदिनच्या हाती पैशाची सूत्रे होती, त्याचप्रमाणे चिनी कम्युनिस्ट पक्षाचा पुढारी चेन तू सू याचा पाठिंबाही होता.

रॉय यांच्या बरोबर आंतरराष्ट्रीय कामगारांचे एक शिष्टमंडळही आले होते. स्वतः त्यांच्या खेरीज त्यात इंग्लंडचे टॉम मॅन, फ्रान्सचे जॅकस दोरियो आणि अमेरिकेचे अर्ल ब्राउडर यांचाही समावेश करण्यात आला होता. 1 मे रोजी कँटन येथे भरविण्यात येणाऱ्या पॅन पॅसिफिक लेबर कॉन्फरन्सला हे शिष्टमंडळ हजर राहाणार होते आणि रॉय यांची तीव्र इच्छा होती की या कॉन्फरन्सला हिंदी शिष्टमंडळानेही हजर राहावे. ती इच्छा फलद्रूप झाली नाही. कारण त्या परिषदेला हजर राहू इच्छिणाऱ्या कामगार पुढाऱ्यांना भारत सरकारने पासपोर्ट द्यावयाचे नाकारले. ही परिषद अखेरीस मे महिन्याच्या अखेरीस हँको येथे भरली.

रॉय आणि त्यांचे शिष्टमंडळ 1920 च्या फेब्रुवारीमध्ये कँटनला पोचले. राष्ट्रवादी सरकार तोपर्यंत हँकोला बदलून गेले होते. हँको हे वुहान म्हणून सामुदायिक रीतीने ओळखल्या जाणाऱ्या तीन शहरांपैकी एक शहर होते. रॉय यांना तेथे जावयाचे होते. पण कँटनमधेच तीन आठवडेपर्यंत अडकून पडले. विमानाने ते हँकोला जाणार होते. पण ऐनवेळी इंजिनात काही बिघाड

झाला आणि रॉय व त्यांच्या सोबत्यांना हमालांकडून उचलल्या जाणाऱ्या खुर्च्यातून प्रवास करावा लागला. या प्रवासाला पाच आठवडे लागले आणि ते हँको येथे पोचेपर्यंत एप्रिल महिना उजाडला या दीर्घ प्रवासामुळे रॉय यांना खेड्यापाड्यातील जीवनाचे प्रत्यक्ष दर्शन घ्यावयाला मिळाले. तथापि त्याहीपेक्षा महत्वाची गोष्ट म्हणजे चिनी कम्युनिस्ट पक्ष व कुओमिंटांगच्या पुढाऱ्यांच्या भेटी घेणे ही होती. वाहतूक व्यवस्थेत बिघाड झाल्यामुळे या भेटी मात्र लांबणीवर पडल्या.

रॉय कँटनला पोहोचेपर्यंत कुओमिंटागची उजवी आघाडी व कम्युनिस्ट पाठिंबा देत असलेली डावी आघाडी यांच्यामधील मतभेदांनी उग्र रूप धारण केले होते. मतभेद सरकारच्या सत्तेचे केंद्र कोठे असावे - नानकिंगमध्ये असावे की वुहानमध्ये असावे, वांग चिंग वे यांना परत येण्यासाठी आमंत्रण देण्यात यावे किंवा नाही आणि विशेषतः कम्युनिस्टांशी सहकार्य करावे किंवा नाही अशा बऱ्याच मुद्यांवर होते. पण डाव्या कुओमिंटांग गटात आणि कम्युनिस्ट वर्तुळांत याबद्दल उघड बोलण्याच्या बाबतीत एक विचित्र टाळाटाळ केली जात असलेली दिसून येत होती. कम्युनिस्ट पक्षाच्या केंद्रीय समितीला जाणीव होती की कुओमिंटांगमध्ये कम्युनिस्ट विरोधी लाट उसळली असून उजवा गट कुओमिंटांगमधील मवाळ वृत्तीच्या लोकाना आपल्या बाजूला वळविण्यात यशस्वी होण्याचा धोका आहे. रॉय यांनी कँटनमध्येच हा धोका जाणला होता आणि त्या विरूध्द त्यानी इषाराही दिला होता. परंतु कम्युनिस्ट पक्ष चियांग कै शेक विरूध्द उघडपणे बोलावयाला तयार नसल्यामुळे हा इषारा गुळमुळीत आणि सूचक पध्दतीनेच देणे भाग होते. रॉय यांनी ओळखलेला धोका हँको येथे ते पोचल्यानंतर काही दिवसांच्या आत खरा ठरला. 12 एप्रिलला यांग कै शेक यांनी शांघायमध्ये कम्युनिस्टांची कत्तल केली. कुओमिंटांगमधील दुफळी त्यानंतर स्पष्ट झाली. दोन राष्ट्रवादी सरकारे अस्तित्वात आली - डाव्या गटाचे हँकोमध्ये आणि उजव्या गटाचे चियांग कै शेक यांच्या नेतृत्वाखाली नानकिंगमध्ये.

कुओमिंटांगमधील दुफळीनंतर रॉय आणि बोरोदिन व चिनी कम्युनिस्ट पक्ष यांच्यामधील मतभेद तीव्रतर झाले. मतभेदाचे मुद्दे बरेच होते. पण मुख्यतः तीन मुद्यांवर ते केंद्रित झाले होते. ते मुद्दे असे : एक, उत्तरेकडील दुसरी मोहीम; दोन, शेतकऱ्यांचे उठाव; आणि तीन, डाव्या कुओमिंटांगशी संबंध. तिसऱ्या मुद्याला जूनच्या सुमारास आणीबाणीचे स्वरूप प्राप्त झाले. त्या सुमारास रॉय यांचे स्पष्ट मत झाले की डावा कुओमिंटांग गट हा आता दोस्त राहिला नसून शत्रू झाला आहे. प्रतिक्रांतीचे साधन बनला आहे. कारण त्यावेळी त्या गटाने शेतकरी आणि कामगार यांच्या विरूध्द युध्द सुरू केले होते आणि चियांग कै शेक यांच्या नेतृत्वाखालील उजव्या

गटाशी तो संगनमत करण्याच्या मार्गावर होता. त्यापूर्वी रॉय यानी बोरोदिन व इतर लोकांच्यासह डाव्या कुओमिंटांग गटाशी हातमिळवणी करण्याची आवश्यकता मान्य केली होती. पण त्यांनी सतत हा आग्रह धरला होता की ही हातमिळवणी विशिष्ट हेतूसाठी आहे आणि तो हेतू साध्य होताच ही हातमिळवणी संपुष्टात आणली पाहिजे.

या मतभेदांची चिनी कम्युनिस्ट पक्षाच्या हँको येथे भरलेल्या केंद्रीय समितीच्या परिषदेत 27 एप्रिलपासून पुढे चर्चा झाली. रॉय यांनी आपला दृष्टिकोन पुढे मांडला जो बोरोदिन व चेन तू सू यांच्या दृष्टिकोनाला अगदीच विरोधी होता. सर्व प्रश्नांच्या बाबतीत काँग्रेसने रॉय यांना पाठिंबा दिला व सर्व निर्णय रॉय यांनी केलेल्या सूचनांनुसार घेण्यात आले. रॉय यांना या निष्कर्षाबद्दल आनंद झाला. पण त्यांचा आनंद फारच थोडा काळ टिकणारा होता. त्यांना कळून आले की घेतलेल्या निर्णयांची अंमलबजावणी केली जात नाही आणि निर्णयांबद्दलही भिन्नभिन्न चिकित्सा केली जात आहे. रॉय हे हतबल होते कारण सर्व परिणामकारक शक्ती बोरोदिन व चेन तू सू यांच्या हाती होती. रॉय यांनी मॉस्कोला कौल लावला. पण मॉस्कोचे उत्तर दुटप्पी स्वरूपाचे होते.

रॉय हे उत्तरेकडील दुसऱ्या मोहिमेला विरोधी होते. त्यांना ही मोहीम ''लष्करी दृष्टीने अव्यवहार्य, राजकीय दृष्टीने धोक्याची आणि सामाजिक दृष्टीने प्रतिगामी'' वाटली. काँग्रेसने त्यांच्या मताला पुष्टी दिली होती. पण वुहान सरकारने ही मोहीम सुरू केली तेव्हा बोरोदिन आणि चिनी कम्युनिस्ट पक्ष यांनी या पायावर पाठिंबा दिला की, हा पाठिंबा देण्यात कुचराई करण्यामुळे डाव्या कम्युनिस्ट गटाशी असलेले नाते तुटून जाईल. अखेरीस ही मोहीम फसली आणि त्यामुळे कुओमिंटांगच्या दोन गटात समझौता होण्याच्या दृष्टीने मार्ग दिसू लागला. मोहीमेबद्दलची चर्चा क्रांती तीव्रतर करावी की व्यापक करावी या धोरणावर केंद्रित झाली होती. रॉय हे क्रांती तीव्रतर करण्याच्या पंथाचे होते आणि त्यासाठी वुहान सरकारने आपल्या अमलाखालील प्रदेशात शेतकरी क्रांतीला उठाव द्यावा असे रॉय यांनी सुचविले होते. बोरोदिन व चिनी कम्युनिस्ट पक्ष यांनी या कल्पनेला विरोध केला तो या कारणासाठी की त्यामुळे कुओमिंटांग मधील जमीनदार व लष्करशहा यांचे शत्रुत्व ओढावून घेतले जाईल. रॉय यांनी यावेळी जी भाषणे केली त्यातून देशातील लष्करी राजकीय व सामाजिक परिस्थितीबद्दलची रॉय . यांची विलक्षण पकड प्रकट झाली.

ही मोहीम सुरू होताच, रॉय यांच्या भाकिताप्रमाणे, सरकारने जनतेला सर्व प्रकारची आंदोलने व कार्यक्रम स्थगित करावयाला सांगितले. सरकारने जी आश्वासने दिली होती ती कृतीत उतरविण्याऐवजी त्याने जनतेला आणखी

त्याग करण्याचे आवाहन केले. औद्योगिक कामगारांना संपावर जाण्याची मनाई करताना सैन्यदलाचा पुरवठा भरभक्कम करण्यासाठी त्यांना जास्त तास काम करण्याची सक्ती करण्यात येऊ लागली. साम्राज्यशाहीविरोधी लढे सुध्दा आंतरराष्ट्रीय पेच निर्माण होतील या सबबीखाली रद्द करण्यात आले. या मोहिमेमुळे कुओमिंटांगमधील लष्करशहांची बाजू अधिक बळकट झाली.

दरम्यान बंडखोरीची भावना खेडोपाडी पसरली होती आणि शेतकऱ्यांनी आपल्यावर जुलूम करणारे जमीनदार व त्यांचे भाडोत्री गुंड यांच्याविरूध्द शस्त्र परजले होते. काही ठिकाणी शेतकऱ्यांनी जमीनदारांसाठी नांगरीत असलेली जमीनच ताब्यात घेतली. इतर ठिकाणी त्यांनी जमीनदाराना हुसकावून लावले. या कृती शेतकऱ्यांच्या अतिरेकी दुष्कृती आहेत असे मानले गेले. कुओमिंटांग नेत्यांनी या अतिरेकी कृतीना आळा घालण्याचे व शेतकऱ्यांना शिस्त घालून देण्याचे कम्युनिस्टाना आदेश दिले. रॉय यांना या अतिरेकी कृती वाटल्या नाहीत. ते शेतकऱ्यांना पाठिंबा देण्याच्या मताचे होते. त्यांचे असे मत होते की शेतकऱ्यांना संघटित रीतीने जमिनीवर ताबा प्रस्थापित करू दिला पाहिजे. त्यांचे असेही मत होते की शेतकऱ्यांच्या संघटना निर्माण करून त्यांच्या हाती राजकीय सत्ता केंद्रित केली पाहिजे. या राजकीय सत्तेमुळे जमीनदारांच्या पैशावर पोसला जाणाऱ्या भाडोत्री गुंडाना निःशस्त्र करण्याचे कार्य पार पाडून क्रांतिकारी सेनेचा कणा होणारे लष्करी दल निर्माण करणे शक्य होईल असाही रॉय यांचा दृष्टिकोन होता. या मुद्यावरही रॉय आणि बोरोदिन व चिनी कम्युनिस्ट पक्ष यांच्यामधे मतभेद झाले.

सर्व मतभेद अर्थातच डावा कुओमिंटांग गट यांच्याशी संबंध ठेवण्याच्या प्रश्नावर केंद्रित झाले होते. बोरोदिन व चेन तू स्यू यांचा यांचे असे मत होते की ते जतन करण्यात यावे त्याचप्रमाणे बळकटही करण्यात यावे. त्याच्या उलट रॉय हे जूनमध्ये अशा निर्णयाला आले होते की या संबंधानी आपले उद्दिष्ट साध्य केले आहे आणि जनतेच्या क्रांतिकारक आंदोलनाच्या अधिकतर विकासाचा हेतू साध्य करण्यासाठी हे संबंध तोडून टाकण्यात यावे. हा वाद काही दिवस असाच चालला. या वादाच्या बाबतीत मॉस्कोने जी भूमिका घेतली ती टाळाटाळ करणाऱ्या आणि परस्पर विसंगत अशा आदेशांच्या स्वरूपाची होती.

तशात काही लष्करशहानी परिस्थिती आपल्या हाती घेतली आणि कम्युनिस्ट व त्यांच्या संघटना यांच्यावर हल्ले सुरू केले. सिया ताओ यू यांचे बंड अशाच प्रकारचे होते. त्याने सरकार ताब्यात घेण्यासाठी राजधानीवर मोर्चा आणला. लोकांच्या उत्स्फूर्त प्रतिकारामुळे त्याचा पराभव झाला आणि त्याला मागे परतवून लावण्यात आले. पण सरकारने त्याच्या विरूध्द उपाययोजना केली नाही. त्यानंतर पंधरा दिवसांच्या आत चांगशा येथे अधिक गंभीर

प्रकारचा उठाव झाला. जनरल सू केहासियांग आणि त्याच्या हाताखालचे अधिकारी यांनी यशस्वी रीतीने सत्ता काबीज केली. रॉय यांनी आपल्या 'रेव्होल्यूशन ॲन्ड काउंटर रेव्होल्यूशन इन चायना' या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे, ''त्यांनी प्रांतिक सरकारला पदच्युत केले, त्या सरकारच्या प्रतिनिधींना तुरूंगात टाकले, कुओमिंटांगची स्थानिक समिती विसर्जित केली, कुओमिंटांगच्या शेतकरी विभागाने चालविलेली राजकीय शाळा बंद केली, आणि सामुदायिक संघटना व कम्युनिस्ट यांच्या विरूध्द नेहमीचे दडपशाहीचे उपाय योजले.''[2] सरकार तरीही कृतिशून्य राहिले. स्थानिक कम्युनिस्ट व कुओमिंटांगचे कृतिशील सभासद यांची या बंडाचा प्रतिकार करण्याची इच्छा होती. त्यांनी शेतकऱ्यांना एकत्रित केले आणि वीस हजारापेक्षा अधिक लोकानी चांगशाला गराडा घातला. तथापी ते जेव्हा शहराच्या वेशीवर पोचले तेव्हा वुहानमधील कम्युनिस्टांच्या नेत्यांनी त्यांना माघार घेण्याचा हुकूम दिला. या सर्व प्रकारांवरून एक गोष्ट स्पष्ट होते की लष्करशहा कम्युनिस्टाना कुओमिंटांगमधून हाकलून देण्यासाठी सज्ज झाले होते.

रॉय यांच्या दृष्टीने परिस्थिती तंग होती पण निराशामय नव्हती. निर्धारपूर्वक चढाई करण्याच्या धोरणाचा ते पुरस्कार करीत होते. त्यांचा सल्ला झुगारून देण्यात आला. कित्येक वर्षानंतर ''माय एक्सपीरिअन्सेस इन चायना'' या पुस्तकात त्यांनी लिहिले : ''निराशेच्या भरात कम्युनिस्ट पक्षाच्या हटवादी राजकीय ब्यूरोला झुगारून देऊन कृती करण्याचा मी प्रयत्न केला. केंद्रीय समितीच्या व्यापक सभेत स्थानिक नेत्यांना आमंत्रित करावे अशीही मी सूचना केली. या मागणीला विरोध करण्यात आला आणि तो या कारणास्तव की या आणीबाणीच्या दिवसात पक्षाच्या मुख्य सभासदांना आपापली स्थाने सोडता येणार नाहीत. सर्वश्रेष्ठ पुढारी व्यापक सभेच्या विरूध्द होते. कारण त्यांना हे ठाऊक होते की स्थानिक कार्यकर्ते निर्णायक कृतीसाठी उत्सुक असून माझ्या योजनेला त्यांनी निश्चितपणे मान्यता दिली असती. अखेरचा उपाय म्हणून चिनी, त्याचप्रमाणे रशियन व्यक्तिगत साथींना घेऊन कृती करण्याचा मी प्रयत्न केला. राष्ट्रीय सरकारचे मुख्य लष्करी सल्लागार जनरल गॅलेन हे संपूर्णपणे माझ्या मताचे होते. अनेक रशियन कॉम्रेडही तोवर माझ्या मताकडे झुकले होते. पण सर्व सत्ता बोरोदिनच्या हाती केंद्रित झाली होती. त्याच्या संधिसाधूपणाविरूध्द मॉस्कोने राजकीय दृष्टीने मला पाठिंबा दिला होता. तथापि इतर दृष्टीने त्याच्या हाती नियंत्रणाची सर्व सूत्रे ठेवण्यात आली होती आणि त्याचा परिणाम म्हणून बोरोदिन हा कम्युनिस्ट पक्षाचा नियंता म्हणूनच कार्य करीत राहिला. चिनी कम्युनिस्ट पक्षाचे श्रेष्ठ पुढारी बहुशः त्याचे शिष्य आणि तात्विक दृष्टीने त्याच्या मार्गाशी मिळते जुळते

घेणारे असल्यामुळे त्यांनी बोरोदिनचाच पाठपुरावा केला. तसे करताना इंटरनॅशनलचे आदेश तर त्यांनी वारंवार झुगारून दिलेच. पण प्रत्यक्षपणे हजर असलेल्या त्याच्या प्रतिनिधीच्या सत्तेलाही आव्हान दिले.''[3] या परिस्थितीत रॉय आणि बोरोदिन हे दोघेही डाव्या कुओमिंटांग गटाचे व राष्ट्रीय सरकारचे पुढारी वांग चिंग वे यांच्याकडे वळले. दोघांनाही असे वाटले की वांग चिंग वे एकच पुढारी आहे की जो परिस्थिती काबूमध्ये आणू शकेल. वांग चिंग वेला असा संशय वाटत होता की कम्युनिस्ट त्याला नव्हे तर प्रबळ लष्करशहा तांग शेंग ची याला पाठिंबा देतील. बोरोदिन व चिनी कम्युनिस्ट पक्ष यांच्या काही कृतींमुळे हा संशय त्यांच्या मनात निर्माण झाला होता. रॉय यांनी वांग चिंग वे याला कम्युनिस्टांचा पाठिंबा आहे हे दाखवून देण्यासाठी जे उपाय योजले त्याचे त्यांनी 'माय एक्सीपीरिअन्सेस इन चायना' या आपल्या पुस्तकात खालीलप्रमाणे वर्णन केले आहे : ''चीनला परत जाताना वांग चिंग वे हे रशियातून गेले होते. तेथे सोव्हिएत सरकार व कम्युनिस्ट इंटरनॅशनल यांच्या संपूर्ण पाठिंब्याबद्दल त्याला अभिवचन देण्यात आले होते..... मी रेडियोद्वारे मॉस्कोला संदेश पाठवून या आश्वासनाचा पुनरूच्चार करण्याची मागणी केली होती. त्याच्या उलट मी त्याला विधायक कृतीची एक योजनाच सादर केली होती, की ज्याच्यायोगे वुहान सरकारवर त्याचे परिणामकारक नेतृत्व पुनः प्रस्थापित होईल. त्याला ती योजना पसंत पडली. पण आवश्यक ती मदत मात्र मिळाली पाहिजे, असा त्याने आग्रह धरला....

''काही दिवसानंतर त्याला हवे असलेले आश्वासन देणारी तर मॉस्कोहून आली. इतर अनेक गोष्टींबरोबर त्या तारेत खालील कार्यक्रम सुचविण्यात आला होता: 'जमीन बळकावणे; सध्याच्या बेभरंवशाच्या जनरल्सचा नाश करणे; वीस हजार कम्युनिस्टाना शस्त्र सज्ज करणे; नवे सैन्य तयार करण्यासाठी पन्नास हजार कामगार व शेतकऱ्यांची निवड करणे; कुओमिंटांगच्या केंद्रिय कार्यकारी मंडळात जुन्या सभासदांऐवजी नवीन शेतकरी व कामगार यांच्या प्रतिनिधींचा समावेश करणे; कुओमिंटांगमधील सुप्रसिध्द व्यक्तीला अध्यक्ष नेमून प्रतिगामी अधिकाऱ्यांवर खटले भरण्यासाठी क्रांतिकारक न्यायालयाची उभारणी करणे.

''तातडीने हवे असलेले आश्वासन यावयाला आधीच फार उशीर झाला होता. दरम्यान कम्युनिस्टांनी आपला विश्वासघात केला आहे असे समजून वांग चिंग वे याने उजव्या गटाशी वाटाघाटी करावयालाही सुरूवात केली होती. उजवा गट तर चांग कै शेक याला संतुष्ट करण्यासाठी कम्युनिस्टांच्या रक्ताचीच मागणी करीत होता.... त्या आणीबाणीच्या प्रसंगी मला वाटले की वांग चिंग वेचा विश्वास संपादन करण्यासाठी एक अखेरचा प्रयत्न केलाच

पाहिजे. मी मॉस्कोहून आलेला संदेश त्याच्याकडे पोचता केला''[4] वांग चिंग वे याने रॉय यांनी दिलेल्या संदेशाची नक्कल पाठविण्याला सांगितले. रॉय यांनी ती लगेच दिली. असे म्हणतात की वांग याने चांग कै शेक याच्याशी आधीच वाटाघाटी करीत असलेल्या आपल्या सहकाऱ्यांना तो संदेश दाखविला. त्यांनी वेगाने कृती करण्याचे ठरविले आणि कम्युनिस्टांविरूध्दची आपली मोहीम सुरू केली. वस्तुस्थिती अशी होती की, खिस्ती जनरल फेंग यू सियांग याने वुहान सरकारला निर्वाणीचा खलिता पाठविल्यानंतर त्यांनी ही मोहीम सुरू करण्याचा निर्णय घेतलाच होता. जनरल फेंग यू सियांग याने वुहान सरकारकडे मागणी केली होती की सर्व राष्ट्रवादी शक्तींनी एकजूट करण्याच्या हेतूने रशियन सल्लागाराना त्या सरकारने बडतर्फ करावे आणि कम्युनिस्ट पक्षाला चिरडून टाकावे. आणीबाणीच्या संदेशाबरोबर एक गर्भित धमकीही देण्यात आली होती की ही सूचना स्वीकारण्यात आली नाही, तर वुहानवर उत्तरेकडून हल्ला करण्यात येईल. या निर्वाणीच्या इषाऱ्याच्या जोडीला वुहान सरकारच्या नेत्यांना आता पुरेपूर जाणीवही झाली होती की कम्युनिस्टांपेक्षा चांग कै शेक यांच्याबरोबर राहिलो तरच आपले सामना हितसंबंध सुरक्षित राहातील. त्यातूनच त्यांचा निर्णय झाला. रॉय यांनी मॉस्कोहून आलेली तार वांग चिंग ने याला दाखविली म्हणून हा निर्णय घेण्यात आला या म्हणण्यात तथ्य नाही.

कुओमिंटांगमधील दोन्ही तट नंतर एकत्र आले. दोघांनी मिळून कम्युनिस्टांविरूध्द युध्द पुकारले. चिनी कम्युनिस्ट पक्ष बेकायदा ठरविण्यात आला आणि हजारो कम्युनिस्टाना पकडण्यात आले. कित्येकांना फाशीही देण्यात आले. कामकरी संघ आणि शेतकऱ्यांचे संघ चिरडून टाकण्यात आले. भयभीत करणारी राजवट अस्तित्वात आली. रशियन सल्लागारांना बडतर्फ करण्यात आले. 27 जुलैला बोरोदिनने हँको सोडले. रॉय जुलैच्या अखेरीला किंवा ऑगस्टच्या सुरूवातीला चीनमधून बाहेर पडले.

रॉय यांची चीनमधील कामगिरी अपयशी ठरली. पण ते अपयश एका व्यक्तीने नव्हते तर संस्थेचे होते. चीनसारख्या प्रचंड लोकसंख्या असलेल्या आणि अनेक प्रकारचे गुंतागुंतीचे प्रश्न असलेल्या देशात कॉमिन्टर्नने क्रांती घडवून आणण्याचा प्रयत्न केला होता. प्रत्यक्ष घडामोडींपासून हजारो मैल राहून हे संचलन केले जात होते. हे एक कल्पनादारिद्रय प्रगट करणारे आणि वेडगळपणाचे साहस होते. कॉमिन्टर्नमध्ये ट्रॉट्स्की व स्तालिन यांच्यामध्ये जो स्पर्धात्मक संघर्ष सुरू झाला होता, त्यामुळे तर परिस्थिती अधिकच बिकट झाली. रॉय यांनी वेळोवेळी आपल्याला आलेल्या आदेशांची अंमलबजावणी उत्कृष्टपणे करण्याचा प्रयत्न केला होता. पण त्यांना फार प्रतिकूल परिस्थितीत

कार्य करावे लागले होते. त्यांच्यामध्ये खरीखुरी सत्ता हाती असलेल्या बोरेदिन व चिनी कम्युनिस्ट पक्षामध्ये गंभीर मतभेद होते. चीनमधील प्रत्यक्ष परिस्थितीही त्यांच्या विरूध्द होती. सरंजामदारी लष्करशहा आणि भांडवलदार यांना परकीय साम्राज्यशाहीचे सहाय्य असल्यामुळे त्यांच्या हाती प्रचंड सत्ता केंद्रित झालेली होती. त्या मानाने कामगार व शेतकरी यांच्या संघटना दुबळ्याच होत्या.

अनेक लोकांनी मॉस्कोची तार वांग चिंग वे याला दाखविल्याबद्दल रॉय यांच्यावर टीका केली आहे. काहींची तर हा विश्वासघात करण्यात आला असे म्हणण्यापर्यंत मजल गेली. काही वर्षांनंतर रॉय हे भारतात आले तेव्हा कम्युनिस्टांनी त्यांच्याविरूध्द हा प्रचार केला. पण अगदी शिकस्त म्हणजे हा उतावळा निर्णय म्हणता येईल. त्यातून काही नवीन चालना मिळाली नाही. डाव्या कुओमिटांग गटाने आपल्या कृतीची दिशा आधीच ठरविली होती. कॉमिन्टर्नच्या कागदपत्रातून रॉय यांच्यावर असा काही ठपका ठेवण्यात आलेला नाही.

चीनमधील कामगिरीतील अपयशानंतर कॉमिन्टर्नमधील उच्च पदांवरून रॉय यांचा अध:पात सुरू झाला. दोन वर्षांनंतर त्या संघटनेपासून त्यांची कायमची फारकत झाली.

**टीपा**

1. या प्रकरणातील माहिती एम. एन. रॉय यांच्या *एक्स्पिरिअन्सिस इन चायना* आणि *रिव्होल्यूशन अँड कांउटररिव्होल्यूशन इन चायना* आणि रॉबर्ट सी. नॉर्थ आणि झिनिया जे. युदिन यांच्या *एम. एन. रॉयज मिशन टू चायना* या कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटी प्रेस, बर्कले यु. एस. ए. ने 1963 साली प्रकाशित केलेल्या पुस्तकावर आधारलेली आहे.
2. रॉय एम. एन. *रिव्होल्यूशन इन चायना.* रेनेसांस पब्लिशर्स, कलकत्ता, 1946 पृ. 517.
3. रॉय, एम. एन. *माय एक्स्पिअरिन्सिस इन चायना.* पृ. 65,66.
4. *कित्ता* पृ.. 70, 72.

# कॉमिन्टर्नशी मतभेद

कॉमिन्टर्नमधील मतभेद हे सोव्हियट कम्युनिस्ट पक्षातील मतभेदांचेच प्रतिबिंब होते. कॉमिन्टर्न हे प्रथमपासूनच सोव्हियट पक्षाच्या प्रभुत्वाखाली राहिले. कारण रशिया हा एकच देश होता, की ज्याने क्रांती घडवून आणली होती आणि जो उभ्या जगात क्रांतिकारक चळवळी विकसित करण्यासाठी मध्यवर्ती संस्थेच्या हाती आवश्यक ती साधनासामुग्री उपलब्ध करून देऊ शकत होता. पुढील काळात हे प्रभुत्व अधिक उघड आणि सक्तीचेही झाले. कॉमिन्टर्नमध्ये ज्या कोणाला कामगिरी करून दाखवावयाची असेल त्याला सोव्हियट पक्ष नेत्यांच्या सदिच्छा संपादन करणेच भाग होते. आणि कालांतराने कॉमिन्टर्न ही सोव्हियट युनियनच्या परराष्ट्र खात्याची बहुश: यंत्रणा बनली. कॉमिन्टर्नच्या या अध:पाताचे रॉय यांनी 'कम्युनिस्टच इंटरनॅशनल' या पुस्तकात यथार्थ वर्णन केले आहे.

कम्युनिस्ट पक्षातील मतभेद 1924 साली लेनिन यांचे निधन झाल्यानंतर अटीतटीला पोचले. प्रथम ट्रॉट्स्की व स्तालिन यांच्यामध्ये नेतृत्वासाठी स्पर्धा झाली. त्यानंतर सोव्हियट युनियनने कोणत्या धोरणाचा स्वीकार करावा याबद्दल मतभेद झाले. या मतभेदांचे स्वरूप ''चिरकालीन क्रांती'' व ''एकाच देशात समाजवाद'' या दोन प्रतिस्पर्धी घोषणातून प्रतीत होईल. ट्रॉट्स्की हे पहिल्या घोषणेशी समरस झाले होते, तर स्तालिन दुसऱ्या घोषणेशी. वेळोवेळी अर्थातच अनेक फिके व गडद रंग तत्वचर्चेत प्रगट झाले आणि धोरणात्मक विविधताही प्रगट होत गेली. निरनिराळ्या गटांच्या भूमिकाही वेळोवेळी बदलत गेल्या. या मतभेदांच्या बाबतीत रॉय हे खंबीरपणे स्तालिनच्या बरोबर राहिले. कारण रशियातील क्रांतीचे फायदे स्थिरबध्द करण्याच्या स्तालिनवादी धोरणावर त्यांचा विश्वास होता. ज्यांचा त्या धोरणावर विश्वास राहिला नाही त्यांना सोव्हियट पक्षातून व कॉमिन्टर्नमधून हाकलून देण्यात आले.

1928 च्या सुमारास स्तालिनने पक्षातील आपल्या शत्रूंचे निर्दालन केले नव्हते. त्यांना नामोहरम करण्यासाठी त्याला डाव्या बाजूला वळण्याची आवश्यकता वाटली. त्या दृष्टीने अवजड उद्योगधंदे व शेतीचे सामुदायीकरण यांच्यावर भर देणारी पहिली पंचवार्षिक योजना सुरू करण्यात आली. 1921 साली लेनिनने नव्या आर्थिक धोरणाच्या स्वरूपात जे माघारीचे धोरण स्वीकारले होते, त्याच्यावर हा आर्थिक क्षेत्रात केलेला हल्ला होता. राष्ट्रीय क्षेत्रातील

या हल्ल्याचे आंतरराष्ट्रीय क्षेत्रातही प्रतिबिंब उमटणे आवश्यक होते. 1928 साली भरविण्यात आलेल्या सहाव्या कॉमिन्टर्नच्या काँग्रेसमधील निर्णयाव्दारे हे उद्दिष्ट साध्य करण्यात आले. या काँग्रेसने, राजकीय व कामकरी संघटनांच्या क्षेत्रात तोपर्यंत संयुक्त आघाडीचे जे धोरण अनुसरले जात होते ते झुगारून दिले. आता ''वर्गाविरूध्द वर्ग'' हे धोरण स्वीकारण्याचा निर्णय घेण्यात आला आणि ज्यांना ते मंजूर झाले नाही, त्यांचा फॅसिस्ट व क्रांतिविरोधक म्हणून धिक्कार केला जाऊ लागला. भांडवलशाहीने आपल्या अध:पाताची तिसरी व अखेरची अवस्था गाठली आहे; या तत्वाचा त्यासाठी पुरस्कार करण्यात येऊ लागला व सर्वांनी भांडवलशाहीविरूध्द सर्वंकष लढाई पुकारावी असा आदेश दिला जाऊ लागला. या सर्व तात्विक व धोरण विषयक भूमिकांशी रॉय सहमत झाले नाहीत आणि त्यांच्याविरूध्दचा आपला मतभेद त्यांनी स्पष्ट नि:संदिग्ध स्वरूपात व्यक्त केला.

चीनमधील कामगिरीतील अपयशानंतर रॉय स्तालिनच्या मेहरनजरेतून उतरले. ट्राट्स्कीविरूध्द चाललेल्या संघर्षात त्यावेळी स्तालिनला चीनमध्ये खरेखुरे किंवा काल्पनिक असे कसेही यश हवे होते. रॉय यांना ते यश मिळविता न आल्यामुळे स्तालिन व त्यांचे सुभेदार यांची त्यांच्यावर फार अवकृपा झाली. चीनमधून परत आल्यानंतर स्तालिनने त्यांची भेट घेतली नाही. आपली भाषणे, निवेदने आणि इतर साहित्य यांची योग्यरीतीने जमवाजमव आणि मांडणी केल्यानंतर रॉय बर्लिनला निघून गेले. 1928 च्या फेब्रुवारीमध्ये कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारिणीची चिनी प्रश्नाची चर्चा करण्यासाठी बैठक भरली होती. रॉय यांना वाटले की तीत आपला दृष्टिकोन मांडण्याची आपल्याला संधी मिळेल. ते या सभेला हजर राहण्यासाठी मॉस्कोला गेले. पण त्यांना आपली बाजू मांडावयाला संधी देण्यात आली नाही. ती सभा चालू असतानाच रॉय कानाच्या गंभीर दुखण्याने आजारी पडले. उपचारासाठी त्यांना कॉमिन्टर्नच्या वरिष्ठ पुढाऱ्यांसाठी राखून ठेवण्यात आलेल्या हॉस्पिटलमध्ये नव्हे, तर मॉस्कोच्या परिसरातील एका सामान्य हॉस्पिटलमध्ये पाठविण्यात आले. आवश्यक ते उपचार करण्यासाठी तेथे वैद्यकीय व्यवस्थाही नव्हती. त्यामुळे रॉय यांच्या मित्रांच्या मनात संशय निर्माण झाला आणि त्यांनी गुप्तपणाने रॉय यांना परदेशी नेले.[1] ही व्यवस्था त्यांनी बुखारिनच्या सहाय्याने केली असा अंदाज आहे. रॉय यांची ही मॉस्कोला अखेरची भेट होती. त्यावेळी रॉय हे तातडीने विमानाने बाहेर पडले नसते, तर स्तालिनच्या क्रोधाला बळी पडलेल्या असंख्य दुर्दैवी जीवात त्यांची भर पडणे शक्य होते.

रॉय यांच्यावरील राजकीय हल्ला सहाव्या काँग्रेसपासून सुरू झाला. तो हल्ला ''निर्वसाहतीकरण''च्या प्रश्नावर सुरू झाला. हा शब्दप्रयोग सहजस्फूर्तपणे प्रथम बुखारिन यांनी केला होता. काँग्रेसच्या बैठकीनंतर काही आठवड्यांनी रॉय यांनी कॉमिन्टर्नला खुलासेवजा जे निवेदन केले, त्यात त्यांनी ही गोष्ट स्पष्ट केली. त्या शब्दाला एक विकृत अर्थ देण्यात आला आणि रॉय यांचा ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाचे पाम दत्त आणि ए.जे. बेनेट यांच्यासारख्या मान्यवर पुढाऱ्यांच्या जोडीने धिक्कार करण्यात आला. आजारीपणामुळे रॉय यांना काँग्रेसला हजर राहून आपल्यावरील आरोपांचे खंडन करता आले नाही.

पण तेथे इतर काहीजण, विशेषत: ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाचे पुढारी होते व त्यांनी खणखणीतपणे रॉय यांच्या भूमिकेचे समर्थन केले. हे समर्थन वाया जाणारेच होते. कारण एका इतिहासकाराने दिग्दर्शित केल्याप्रमाणे रशियन नेत्यांनी 'निर्वसाहतीकरण' हा एक अमंगळ शब्द मानून रॉय यांच्यावर हल्ला करण्याचे निश्चित ठरविले होते. हा हल्ला युजेन व्हार्गा या अर्थतज्ज्ञाने विशद केलेल्या एका तत्वविचाराच्या पायावर कुसेनिन यांनी चढविला. व्हार्गा यांचा तत्वविचार असा होता की ब्रिटनने भारताला एक शेती विषयक बांडगूळ मानण्याचे सर्वसाधारण धोरण पुढे चालू ठेवण्याचे ठरविले आहे. कच्च्या मालाच्या पुरवठ्याचे साधन आणि ब्रिटिश निर्यात उद्योगधंद्यांची बाजारपेठ हेच या धोरणाचे सार असून भारतात औद्योगीकरणापेक्षा ग्रामीण अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करण्यावरच अधिक भर दिला जाईल, असा निष्कर्ष व्हार्गा यांनी काढला होता.

रॉय यांनी व्हार्गा यांच्या या तत्वविचाराला ठाम विरोध केला आणि दाखवून दिले की युध्दोत्तर परिस्थितीमुळे ग्रेट ब्रिटनला भारतातील उद्योगांच्या विकासाला प्रतिबंध घालण्याचे जुने धोरण सोडून देणे भाग पडले आहे. रॉय यांना जे 'निर्वसाहतीकरण' अभिप्रेत होते ते कामगार व शेतकऱ्यांच्या संबंधातील नव्हे तर भांडवलदार वर्गाच्या संबंधातील. रॉय म्हणतात: ''भारतीय भांडवलदारांचे सर्वकष वासाहतिक जुलुमजबरदस्तीच्या अवस्थेतून ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्यापर्यंत हळूहळू विकसन होत चालले आहे. म्हणून क्रांतीचा धोक्याचा मार्ग चोखाळण्याची त्यांना आवश्यकता नाही. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर आर्थिक व राजकीय प्रतिष्ठेच्या दृष्टीने भारतीय भांडवलदारांचे वाढते 'निर्वसाहतीकरण' होत चालल्यामुळे तो वर्ग क्रांतीला पाररखाच झाला आहे. थोडक्याच काळात त्यांच्या वर्गाचे 'निर्वसाहतीकरण' अधिक मोठ्या प्रमाणात झाले, तर हा वर्ग नि:संशय क्रांतिविरोधी होईल. काही प्रमाणातील राजकीय सत्ता वसाहतीतील भांडवलदारांच्या हाती सोपविली गेली, तर त्यामुळे साम्राज्यशाही दुबळी होत नाही; कारण देशी भांडवलदार या सत्तेचा वापर साम्राज्यशाहीविरोधी संघर्षाला धार चढविण्यासाठी करणार नाहीत तर क्रांतिकारक आंदोलन चिरडून

टाकण्यासाठी करतील. इतर वासाहतिक देशांच्या अनुभवातून हे सिध्द झाले आहे. भारतीय भांडवलदारांचे 'निर्वसाहतीकरण' हे अशा रीतीने स्वप्नरंजन राहिलेले नाही. ते एक सत्य आहे आणि तीच परिस्थितीची गुरूकिल्ली आहे.''[2] रॉय यांनी हे स्पष्टीकरण 1929 साली कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाला सादर केलेल्या सर्वव्यापक निवेदनात केले. ते 'अवर डिफरन्सेस' या त्यांच्या पुस्तकात संपूर्णपणे प्रसिध्द करण्यात आले आहे.

'निर्वसाहतीकरण' आणि रॉय यांच्या विरूध्दची मोहीम तेवढी महत्वाची नव्हतो त्याहीपेक्षा महत्वाची होती ती ध्येय धोरणाची नवी भूमिका. ती अतिडावी, साहसवादी भूमिका होती. इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाच्या दहाव्या बैठकीने स्पष्ट केल्याप्रमाणे भारतीय कम्युनिस्टांना इंडियन नॅशनल कॉंग्रेस आणि इंडिपेंडन्स लीग यांच्यासारख्या डाव्यांच्या संघटना यांच्याशी असलेले संबंध तोडावयाला सांगण्यात आले. त्या संघटना साम्राज्यशाही व भांडवलशाहीच्या हस्तक आहेत आणि क्रांतीचा विश्वासघात करण्याऱ्या आहेत अशी त्यांच्याविरूध्द सामुदायिक मोहीम काढण्याचा आदेश देण्यात आला आणि कामगार व शेतकऱ्यांच्या पक्षांचे विसर्जन करून कॉंग्रेसविरूध्द एक नवी साम्राज्यशाही विरोधी आघाडी उघडणाचा संदेश देण्यात आला. कामकरी क्षेत्रात, कम्युनिस्टाना प्रस्थापित संघटनेमधून बाहेर पडण्याचे, नवीन लाल कामकरी संघ उभारण्याचे, कामगारांचे संघर्ष तीव्रतर करण्याचे आणि त्यांना देशव्यापी राजकीय संघासाठी तयार करण्याचे आदेश देण्यात आले. हे सर्व आदेश राजकीय आणि कामगार संघविषयक अव्यवहार्य आणि विध्वंसक होते. त्या आदेशांनी कम्युनिस्टाना अक्षरश: वैराण वाळवंटात उभे केले आणि एका लहानशा पंथाची त्यांना गती आणली.[3] ही जी भूमिका कम्युनिस्टांवर लादण्यात आली, ती रॉय यांच्या मार्गदर्शनाखाली आतापर्यंत कम्युनिस्टांनी ज्या भूमिकेचा पुरस्कार केला होता तिच्याशी सर्वस्वी विरोधी होती.

कॉमिन्टर्नच्या नव्या भूमिकांमुळे युरोपीय देशातही तितकेच भयानक परिणाम घडून आले. जर्मनीतील परिणाम तर विशेष विध्वंसक ठरले. हिटलरच्या उत्कर्षाला त्या भूमिकेने मोठेच पाठबळ दिले असेही म्हणता येईल. सोशल डेमोक्रेटिक लोकांच्या विरूध्द काढण्यात आलेली मोहीम; त्यांना 'सोशल फॅसिस्ट' म्हणण्यापर्यंत गेलेली मजल आणि त्यांना फॅसिस्टांपेक्षाही कम्युनिस्टांचे अधिक भयानक शत्रू मानणे यामुळे त्याचप्रमाणे प्रस्थापित कामकरी संघात दुफळी पाडणे आणि त्यांचा नाश घडवून आणणे यासाठी जी तितकीच विषारी मोहीम काढण्यात आली तिच्यामुळे कामगारांचे नीतीधैर्य खचले आणि हिटलरच्या वाढत्या संकटाविरूध्द होणारा त्यांचा प्रतिकार दुबळा झाला.

कॉंग्रेसनंतर काही दिवसांनी शिस्तीचा बडगा उभारण्याबद्दलची मोहीम

निघाली. नव्या भूमिकेचा ज्यांनी नि:संकोचपणे स्वीकार केला नाही. त्यांना पक्षातून व कॉमिन्टर्नमधून बाहेर फेकून देण्यात आले. ब्रिटनच्या कम्युनिस्ट पक्षातील ज्या सभासदांनी विरोधी मत प्रदर्शित केले होते. त्यांना शरणागती पत्करावयाला लावण्यात आली आणि एक वर्षानंतर एक नवे नेतृत्व त्यांच्यावर लादण्यात आले. अमेरिकेत विरोधी मताचे लोक पक्षात बहुसंख्य होते. पण 1929 च्या जूनमध्ये त्या सर्वांना उजवीकडे झुकल्याबद्दल पक्षातून हाकलून देण्यात आले. जर्मनीमध्ये रॉय यांचे मित्र असलेले ब्रँडलर व थलहायमार यांच्या नेतृत्वाखालील गटाला त्याच कारणासाठी बाहेर फेकून देण्यात आले. बुखारिनलाही सोडण्यात आले नाही. दुसऱ्याच वर्षी त्याला इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळातून आणि सोव्हियट कम्युनिस्ट पक्षाच्या पॉलिट ब्यूरोमधून हाकलून देण्यात आले. त्याच्यावरील आरोप कॉमिन्टर्नमधील उजव्या गटाच्या लोकांना पाठिंबा देणे हा होता.[4] आश्चर्य असे की रॉय - गुन्हेगारांचा अग्रणी, आणि कुसेनीन यांच्या शब्दात सांगावयाचे तर ''साम्राज्यवादाचे हस्तक'' आणि 'निर्वसाहतीकरणाच्या' कल्पनेचे जनक यांच्या विरूध्दच्या उपाययोजनेला वर्षभराचा विलंब लावण्यात आला. 1929 जूनमध्ये दहाव्या प्लेनमची जेव्हा बैठक झाली तेव्हा 'द्रोही' म्हणून त्यांचा निषेध करण्यात आला. पण प्रत्यक्ष उपाययोजना सहा महिन्यानंतर करण्यात आली. 21 डिसेंबर 1929 च्या 'इन्प्रेकार' मध्ये खालील घोषणा करण्यात आली: ''इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाच्या प्लेनम्ने मंजूर केलेला ठराव (आंतरराष्ट्रीय परिस्थिती आणि कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे कार्य, परिच्छेद 9 ) आणि 19 डिसेंबर 1924 रोजी भरलेल्या प्रीसिडियमच्या बैठकीतील निर्णय यानुसार, ज्याअर्थी ब्रँडलर संघटनेचे पक्षपाती हे कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे सभासद राहू शकत नाहीत त्याअर्थी इंटरनॅशनलचे प्रीसिडियम असे जाहीर करीत आहे की रॉय यांनी ब्रँडलर वृत्तपत्रात लेख लिहून आणि ब्रँडलर संघटनेला पाठिंबा देऊन स्वत:ला कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या सभासदांपासून अलग करून घेतले आहे आणि त्या दृष्टीने ते कम्युनिस्ट इंटरनॅशनलमधून बडतर्फ केले गेले आहेत.''[5] या कृतीला इतका विलंब का लावण्यात आला त्याचे कारण देण्यात आले नाही. बहुधा कॉमिन्टर्नचे अधिकाऱ्यांना क्षमायाचना किंवा निदान मौन तरी अपेक्षित असावे. पण रॉय यांनी क्षमायाचना केली नाही किंवा मौनही पाळले नाही. आपली मते ते प्रदर्शित करीतच राहिले. त्यांनी जर्मनी व अमेरिका यातील विरोधी मतप्रदर्शन करणाऱ्या लोकांशी सहकार्य करून सहाव्या कॉंग्रेसने मंजूर केलेल्या भूमिकेत सुधारणा करण्यासाठी दडपण आणण्यालाही सुरूवात केली. ब्रँडलर गटाच्या नियतकालिकातून त्यांनी या भूमिकेवर कडक टीका करणारे लेख लिहिले. हे अर्थातच सहन केले जाणे शक्य नव्हते. म्हणून अखेरीस त्यांना कॉमिन्टर्नच्या गोटातून हाकलून देण्यात आले.

कॉमिन्टर्नच्या सभासदांना उद्देशून लिहिलेल्या आणि कालांतराने 'अवर डिफरन्सेस' या पुस्तकात प्रसिध्द केलेल्या खुल्या पत्रात रॉय यांनी दहाव्या प्लेनममध्ये काय घडले त्याचे मनोरम चित्र रेखाटले आहे. तसेच आपल्या भूमिकेचा तडफदार बचाव दिला आहे. या खुल्या पत्रातील काही उत्तरे कदाचित् उद्‌बोधक ठरतील. रॉय लिहितात: ''काही काळ मी पवित्र गिलोटीन पुढे उभा राहिलेलो आहे की ज्यांचा उन्मादपूर्ण उपयोग केला गेल्यामुळे आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट आंदोलनात एवढा हाहाकार उडत आहे. अशा रीतीने वर्षभर मी उभा आहे. माझे डोके उडविले जाईल, या बद्दलच्या दहशतीने नव्हे, तर या आंदोलनाचे नेतृत्व ज्यांनी बळकावले आहे त्यांच्या अकार्यक्षमतेने दिङ्मूढ होऊन आणि हे अकार्यक्षम व बेजबाबदार नेतृत्व ज्या बेमुर्वतपणे हे आंदोलन छिन्न विच्छिन्न करीत आहे त्याबद्दल अक्षरश: चकित होऊन अखेरीस अनाकलनीय अशा विलंबानंतर माझी पाळी आली आहे. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाच्या दहाव्या प्लेनममध्ये शालीन कुसेनीनने जबाबदारी टाळण्याच्या आपल्या वैशिष्ट्यपूर्ण पध्दतीने माझ्या विनम्र मस्तकाची मागणी केली. माझा अगदी अलीकडील 'गुन्हा' म्हणून त्याने जो सांगितला तो हा की जर्मन विरोधकांच्या वृत्तपत्रात मी लेख लिहिले. त्याचा युक्तिवाद हा की अशा प्रकारचा भयानक गुन्हा केलेली व्यक्ती, ज्यांच्या मतांचे तो प्रतिनिधित्व करीत आहे त्यांचा कॉम्रेड कसा राहू शकतो? साहजिकच त्याचे पारिपत्य हे झालेच पाहिजे. त्यासाठी रंगमंच तयार करण्यात आला, ''जनतेने'' प्रतिसाद दिला. दूर कोठून तरी कोपऱ्यातून पूर्वनियोजित आवाज निघाला ''ठेचा त्याला'' आणि कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या जवळजवळ प्रतिष्ठापनेच्या काळापासून त्याच्याशी संबंधित असलेल्या, त्यापूर्वी कित्येक वर्षे क्रांतिकारक चळवळीत क्रियाशील राहिलेल्या, आजवर तथाकथित ''डाव्या प्रवृत्तींबद्दल'' संशय घेतल्या गेलेल्या - टीका विषय झालेल्या एका व्यक्तीला कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कक्षेबाहेर यांत्रिक पध्दतीने फेकून देण्यात आले.''[6]

'निर्वसाहतीकरणाच्या' भूमिकेचे जे विकृत स्वरूप कुसेनीन याने दिग्दर्शित केले होते, त्याबद्दल रॉय म्हणतात ''कुसेनीन याची मजल येथवर गेली की मी संपादित केलेल्या 'व्हॅनगार्ड' व 'मॅसेस' या वृत्तपत्रातील स्तंभातून अनेक वर्षे या सोशल डेमोक्रॅटिक भूमिकेचा मी प्रचार करीत होतो असेही त्याने ठासून सांगितले. या आरोपातील धादांत खोटेपणा या नियतकालिकांच्या जुन्या अंकांतून सिध्द होईल. त्या अंकात कुसेनीन यांच्या आरोपाला आधार देणारा एक तरी परिच्छेद कोणीही दाखवून द्यावा, असे माझे आव्हान आहे. ती नियतकालिके माझ्या संपादकत्वाखाली प्रकाशित होत होती ती भारतातील कम्युनिस्ट प्रचाराची केंद्रीय मुखपत्रे म्हणून. तो कालखंड मे 1922 ते

1927 च्या सुरूवातीचा काळ होय (1927 च्या पहिल्या आठ महिन्यात मी चीनमधे असल्यामुळे त्या कालखंडातील लेखनाला मी जबाबदार नाही) त्या साऱ्या काळात उजवीकडे झुकत असल्याबद्दल एकदाही माझ्याविरूध्द टीकेचा सूर निघाला नाही.'' रॉय पुढे लिहितात ''आता शोध लागला आहे की या साऱ्या काळात मी साम्राज्यशाहीचा सोशल डेमोक्रॅटिक हस्तक होतो हे मान्य करण्यात आले तर तर्कशुध्द रीतीने सहावी कॉंग्रेस भरेपर्यंतच्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलने भारताबद्दल चुकीचा दृष्टिकोन ठेवला याची कबुली द्यावीच लागेल. सहाव्या कॉंग्रेसचा अहवाल आणि प्रबंधात लेनिनवादाचे सर्वोच्च ज्ञानपणा प्रतिबिंबित झाले आहे असे म्हटले तर वसाहत विषयक (विशेषतः भारतीय) प्रश्नांच्या बाबतीत लेनिन, झिनोव्हीव्ह, बुखारिन, स्तालिन हे सर्वच आपापल्या परीने लेनिनविरोधी, साम्राज्यशाहीचे सोशल डेमोक्रॅटिक हस्तक ठरतात आणि सहाव्या कॉंग्रेसच्या वसाहत विषयक आणि इतर प्रश्नांच्या बाबतीतील ठरावाचा भावार्थ अगदी हाच ठरेल. सहाव्या कॉंग्रेसची ही भूमिका उघडउघड लेनिनच्या धोरणविषयक शिकवणूकीची प्रतारणा आहे.''[7]

या पत्रात अखेरीस म्हटले आहे. ''माझ्यावर जे गुन्हे केल्याचा आरोप करण्यात आला आहे ते गुन्हे मी मुळीच केलेले नाहीत. माझा गुन्हा आहे तो हा की स्वतंत्र विचार करण्याच्या हक्काचा मी आग्रह धरला आहे आणि सध्याच्या ज्या आणीबाणीच्या काळातून कम्युनिस्ट इंटरनॅशनल जात आहे, त्यात या हक्काची मागणी करणे मंजूर नाही. माझ्या मतभेदांची मी वाच्यता करीपर्यंत मला 'द्रोही' ठरविले गेले नाही आणि अधिकृत इंटरनॅशनलच्या कक्षेबाहेर टाकले गेले नाही. माझ्यावर मौन पाळण्याचे दडपण टाकण्यात आले होते आणि अतिप्रबळ यंत्रणेने आपले विचार प्रगट करण्याचा माझा अधिकारच हिरावून घेतला होता. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, माझा आवाज उठविण्याचे मी धाडस केले नसते तर, स्वतंत्र विचार करण्याच्या गुन्ह्याबद्दल मला अदृश्याच्या गर्तेत निःशब्दपणे कायमचे गाडले गेले असते. तथापि क्रांतिकारकाचे कर्तव्य काही वेळी सक्तीच्या शिस्तीच्या संकुचित मर्यादाचे उल्लंघन केल्याशिवाय राहात नाही.''

''माझी परिस्थिती अशी झाली होती की त्यावेळी मला वाटले की इंटरनॅशनलचा विध्वंस करणाऱ्या सध्याच्या नेतृत्त्वाविरूध्द विरोधकाना साथ देणे हे माझे क्रांतिकारक कर्तव्यच आहे.''

''सहाव्या कॉंग्रेसच्या भारताविषयक ठरावाच्या बाबतीतच नव्हे, तर सर्वच ठरावांच्या बाबतीत मी असहमत आहे. चूक एखाद्या प्रश्नाच्या बाबतीत असती तर कालांतराने ती दुरूस्त केली जाईल या आशेने वाट पाहणे श्रेयस्कर ठरले असते. पण भारतात अमलात आणली जाणारी चुकीची भूमिका ही

एका प्रचंड घोडचुकीचाच फक्त एक लहानसा भाग आहे. म्हणून आता स्वस्थ बसणे समर्थनीय ठरणार नाही. इंटरनॅशनलच आज एका गंभीर पेच प्रसंगात सापडले आहे आणि नेतृत्वाचा साचा आणि त्याच्या कृती यातून पेच स्पष्टपणे दिग्दर्शित होत आहे.''[8] खुल्या पत्राचा काहीही परिणाम झाला नाही. माथेफिरूपणाची भूमिका तशीच चालू ठेवण्यात आली. ती साली झालेल्या सातव्या कॉंग्रेसमध्ये बदलण्यात आली. दरम्यान हिटलरने आपली फॅसिस्ट हुकुमशाही जर्मनीवर लादून सहाव्या कॉंग्रेसच्या भूमिकेचा फेरविचार करण्याला स्तालिनला भाग पाडले होते. ही भूमिका बदल्यानंतरही रॉय यांच्या मागणीप्रमाणे, त्यांना कॉमिन्टर्नमध्ये पुन्हा प्रवेश देण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यात आला नाही.

इंटरनॅशनलमधून रॉय यांचे उच्चाटन झाल्यानंतर कम्युनिस्टानी रॉय यांच्यावर अनेक प्रकारचे आरोप करावयाला सुरूवात केली. एक आरोप असा होता की रॉय यानी कम्युनिस्टांच्या भारतातील सामर्थ्याचे आणि आपल्या त्या देशातील प्रभावाचे अतिरंजित चित्र रंगविंले. दुसरा आरोप त्यानी बराचसा पैशाचा अपहार केला. या दोन्ही आरोपांचा, प्रत्यक्षपणे कोणते अहवाल सादर करण्यात आले आणि रॉय यांच्याकडे वितरणासाठी कितीसे द्रव्य देण्यात आले याचे ज्ञान होईपर्यंत विचार करता येणार नाही. दोन्ही गोष्टी गुप्त आहेत आणि क्रेमलिनने अद्याप तरी त्यावर प्रकाश टाकण्याचे औचित्य दाखविलेले नाही. जाता जाता एवढे मात्र सुचविता येईल की क्रेमलिन आणि कॉमिन्टर्न भारतामध्ये जे कार्य करीत होते त्याचे सूत्रधार रॉय हे एकटेच नव्हते.

कॉमिन्टर्नशी फारकत हा रॉय यांच्यावरील मोठाच आघात होता. भारतीय स्वातंत्र्यासाठी ते जे कार्य करीत होते, त्यात यामुळे खंड पडला. कम्युनिस्ट वृत्तपत्रातून ते भारताबद्दल 1929 सालच्या मध्यापर्यंत लिहीत राहिले. त्यानंतर ते साधनही नष्ट झाले. मग मात्र भारतीय क्रांतीच्या सेवेसाठी इतर मार्ग धुंडाळण्याचा त्यांना विचार करावा लागला. कल्पक आणि धाडसी असे ते नेहमीच असल्यामुळे त्यांनी लवकरच एक मार्ग शोधून काढला. पुढील प्रकरणात त्याचे व त्यातून निर्माण झालेल्या परिणामांचे दिग्दर्शन करण्यात येईल.

## टीपा

1. हॅथकॉक्स, जे. पी. *कम्युनिझम अँड नॅशनॅलिझम इन इंडिया : एम. एन. अँड कॉमिन्टर्न पॉलिसी, 1920 - 1939,* प्रिन्स्टन युनिव्हर्सिटी प्रेस, 1971. पृ. 86, 87.
2. रॉय, एम. एन. *अवर डिफरन्सेस,* सरस्वती लायब्ररी, कलकत्ता, 1938. पृ. 130 ते 135.
3. *कित्ता,* पृ. 130 ते 135.
4. हॅथकॉक्स, पृ. 130, 137.

5. *कम्युनिझम इन इंडिया,* ओव्हरस्ट्रीट अँड विंडमीलर, पृ. 140, 141
6. *अवर डिफरन्सेस,* पृ. 25.
7. *कित्ता,* पृ. 27 ते 29.
8. *कित्ता,* पृ. 42 ते 43.

# भारतात प्रवेश आणि तुरूंगवास

रॉय हे भारतात परत यावयाला व भारतीय स्वातंत्र्य लढ्यात भाग घ्यावयाला नेहमीच उत्सुक होते. त्यानी मॉस्कोला जावयाची सूचना मान्य केली, ती मॉस्को हे भारताच्या वाटेवर होते म्हणून. दुसऱ्या कॉमिन्टर्न कॉंग्रेसनंतर त्यानी ताश्कंद मधील कार्यस्थळावर जावयाचे कबूल केले ते भारताच्या जवळ मुक्काम करावा लागत आहे म्हणून. त्यानंतर लेनिनच्या सल्ल्यानुसार त्यानी भारताला जाण्याची आपली इच्छा दाबून ठेवली. कारण लेनिनने त्यांना सांगितले होते की आपल्याबरोबर कार्य करण्यासाठी थोडे सहकारी निर्माण केल्याशिवाय त्यानी भारतात जाऊ नये. भारतात काही कम्युनिस्ट गट तयार झाल्यानंतर भारतात परत जाण्याची इच्छा पुनरूज्जीवित झाली. स्तालिनपाशी त्यानी भारतात परत जाण्याची परवानगी देण्याबद्दल पुनःपुनः गळ घातली. असे म्हणतात की स्तालिनने त्यांच्या जाण्याला मान्यता दिली. पण चीनमधील कामगिरी पार पाडल्यानंतर चीनमधील कामगिरी दुर्दैवाने फसली, रॉय यांचे स्तालिनकडील वजन नाहीसे झाले आणि कालांतराने त्यांना कॉमिन्टर्नच्या कक्षेबाहेर फेकण्यात आले. त्यानंतर त्यांना स्वतःच्या हिमतीवर उभे राहावे लागले. त्यांना असे वाटू लागले की आपण भारतात परत गेलो तरच ते भारताच्या दृष्टीने उपयुक्त होईल. त्यांना सहाव्या कॉमिन्टर्न कॉंग्रेसच्या अतिरेकी डाव्या भूमिकेचे पर्यवसन काय होत आहे, हे पाहून तर मनस्वी दुःख झाले. त्यांना दिसून आले की कम्युनिस्टांनी स्वतःचा नाश करून घेतला असून डाव्या प्रवृत्तीच्या आंदोलनाचेही भयंकर नुकसान केले आहे. गांधीजीनी पुरस्कारिलेल्या सामुदायिक आंदोलनाचा उठावही त्यांना दिसत होता. कॉंग्रेसला क्रांतीच्या मार्गावर खेचून नेण्यासाठी ही केवढी उज्वल संधी निर्माण झाली आहे, याचीही त्यांना जाणीव झाली.

रॉय यांचे भारतात जाण्याबद्दल 1930 सालच्या मध्यावर निश्चित मत झाले. तोवर त्यांनी आपल्याभोवती तरूण भारतीयांचा एक लहानसा गट उभा केला होता. या तरूणांनी त्यांचा दृष्टिकोन स्वीकारला होता आणि व्यक्तिशःही त्यांनी रॉय यांना निष्ठा वाहिली होती. त्यांनी पूर्वी भारतात व युरोपमधे ज्या कम्युनिस्टाना प्रशिक्षित केले होते, त्यांनी कॉमिन्टर्नबरोबर राहाण्याचेच पसंत केले. त्यांनी रॉय यांच्याशी संबंध तोडले आणि रॉय यांना शिव्याशाप देण्यासाठी व त्यांचा धिक्कार करण्यासाठी ते कॉमिन्टर्नच्या छावणीत उभे राहिले.

रॉय यांनी भारतात जाण्याच्या आपल्या योजनेची नव्या मित्रांबरोबर चर्चा केली. ती योजना मान्य करण्यात आली आणि असा निर्णय घेण्यात आला की त्यांच्यापैकी तिघांनी रॉय यांच्या यात्रेसाठी अनुकूल वातावरण तयार करण्यासाठी ताबडतोब भारतात जावे. ज्या तिघांनी हे कार्य हाती घेतले ते मुंबईचे तय्यब शेख व सुंदर काबाडी आणि लखनौचे ब्रजेशसिंग हे होते. ते रॉय यांनी तयार केलेला जाहीरनामा घेऊन भारतात परतले. या जाहीरनाम्यात रॉय यांनी काँग्रेसने सुरू केलेलं सामुदायिक आंदोलन क्रमाक्रमाने राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी होणाऱ्या क्रांतिकारक चळवळीत प्रथम कसे रूपांतरित होईल आणि सामाजिक क्रांतीची पहिली अवस्था ते कशी गाठील याचे दिग्दर्शन केले होते. त्यामागील कल्पना या जाहीरनाम्याला सामान्य काँग्रेसजन व युवक नेते आणि इतर यांची मान्यता प्राप्त करून घेणे ही होती.[1] रॉय त्यानंतर 1930 सालच्या डिसेंबरमध्ये भारतात आले. ते बोटीने 11 डिसेंबर रोजी कराचीला उतरले आणि त्यानंतर त्यांनी मुंबईचा रस्ता धरला. त्यांनी खोट्या पारपत्रावर प्रवास केला होता आणि कानपूर कम्युनिस्ट कटाच्या खटल्यातील त्यांच्याविरूध्द काढण्यात आलेले वॉरंट अद्याप जारी असल्यामुळे त्यांना पोलिसांना चुकवूनच वावरावे लागले. ब्रिटिश पोलिसानी युरोपमधील त्यांच्या हालचालीवर पाळत ठेवलीच होती, त्यांना लवकरच कळून आले की रॉय हे भारतात गेले आहेत. भारतीय पोलीसांना त्याप्रमाणे बातमी देण्यात आली ते देशभर त्यांचा शोध घेऊ लागले.

भारतात परतल्यानंतर आपल्यापुढे काय वाढून ठेवले आहे याची रॉय यांना कल्पना होती. त्यांना हे माहीत होते की त्यांना काही वर्षे कारावासात काढावी लागतील. भारतीय स्वातंत्र्यासाठी उघडपणे व खुलेपणाने काम करण्याची संधी प्राप्त करून घेण्यासाठी ही किंमत मोजावी लागेल हे ते पुरेपूर जाणून होते. जर्मनीतील त्यांच्या मित्रांना हे भवितव्य आवडले नव्हते आणि हा धोका पत्करण्यापासून त्यांना परावृत्त करण्याचाही त्यांनी प्रयत्न केला होता. रॉय यांनी त्यांचा सल्ला झिडकारून लावला आणि भारताच्या मोहिमेवर ते निघाले. त्यांची ही आशा होती की पोलीसांच्या जाळ्यात सापडण्यापूर्वी त्यांना काहीतरी भरभक्कम कार्य करून, तुरूंगातून सुटल्यानंतर ज्यावर काही उभारणी करता येऊ शकेल असा त्यांना पाया घालता येईल. त्यांना अटक करून घ्यावयाची नव्हती. त्याचप्रमाणे ती टाळण्यासाठी दूर कोठेतरी दडूनही राहावयाचे नव्हते. राष्ट्रीय आंदोलनाच्या मध्यभागी त्यांना उभे राहावयाचे होते की ज्यायोगे त्या आंदोलनावर थोडा तरी प्रभाव त्यांना टाकता येईल आणि आपल्या विचारसरणीचे शक्य होतील तेवढे अनुयायी मिळविता येतील.

रॉय हे सुमारे सात महिने अटक टाळू शकले. त्यांना 21 जुलै

1931 रोजी मुंबईत अटक करण्यात आली. मुंबईमध्ये रॉय डॉ. महमूद या नावाने वावरत होते. त्या सात महिन्यात ते मुंबईत व उत्तर प्रदेशमधील काही भागात हिंडले, त्यांनी बऱ्याच काँग्रेस कामकरी संघातील पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या. जवाहरलाल नेहरू, वल्लभभाई पटेल, एन्.एम. जोशी आणि डॉ. आंबेडकर यांचा त्यात समावेश होतो. ते कराची काँग्रेसलाही हजर राहिले. तेथे ते सुभाषचंद्र बोस यांना भेटले आणि जवाहरलाल नेहरू यांच्याशी त्यांनी आता सुप्रसिध्द झालेल्या कराची ठरावाच्या मूलभूत कल्पनांबद्दल चर्चा केली. एकेवेळी जो समज निर्माण झाला होता, त्याप्रमाणे त्या ठरावाचा मसुदा तयार करण्यात मात्र त्यांचा हात नव्हता. पण त्यांनी काँग्रेसने आर्थिक कार्यक्रम आखणे आवश्यक आहे, याबद्दल मात्र नेहरूंच्या मनावर छाप टाकली होती आणि अटकेपूर्वी त्यांनी जे अत्यंत महत्वाचे कार्य पार पाडले ते म्हणजे मुंबई व इतर थोड्या जागी रॉय गट स्थापन केले हे होय. रॉय गटात काँग्रेस, कामकरी संघ व युवक संघ यातील तरूण, उत्साही कार्यकर्त्यांचा समावेश झाला. रॉय यांचा कार्यक्रम त्यांनी स्वीकारला व रॉय यांचे व्यक्तिमत्व व कर्तृत्व यांची त्यांच्या मनावर मोहिनी पडली म्हणून या गटाला रॉय गट असे नाव पडले.

रॉय भारतात परतले तेव्हा ते निष्ठावंत कम्युनिस्ट होते. त्यांची कॉमिन्टर्नपासून फारकत झाली होती; कम्युनिझमपासून नव्हे. त्यांचे उद्दिष्ट या देशात खराखुरा कम्युनिस्ट पक्ष उभारण्याचे होते. त्यांना कम्युनिस्ट पक्ष असा हवा होता की ज्याला राष्ट्रीय क्रांतीतून कम्युनिझमकडे कशी प्रगती करावयाची याचे ज्ञान असेल आणि जो स्वतःच्या विचाराने, देशातील प्रत्यक्ष परिस्थितीला अनुरूप असा कार्यक्रम व धोरण यांची आखणी करू शकेल. अस्तित्वात असलेला कम्युनिस्ट पक्ष, ज्याच्या बांधणीला त्यांनी स्वतः एकवेळ मदत केली होती. तो सरकारी दडपशाही व 1929 सालापासून आचरणात आणली गेलेली अतिडावी भूमिका यामुळे उध्वस्त परिस्थितीत होता. पक्षाचे जुने पुढारी मीरत कटाच्या खटल्यात गोवले गेल्यामुळे तुरूंगात होते आणि पक्षाचे नेतृत्व आता तरूण, अननुभवी गटाच्या हाती गेले होते. कॉमिन्टर्नचे त्यांना आदेश होते की बाहेरून येणारे हुकूम कोठलाही प्रश्न न विचारता अंमलात आणले जावे. रॉय यांची अशी इच्छा होती की मरणोन्मुख झालेल्या या पक्षाच्या जागी एक चैतन्यपूर्ण संघटना उभी करावी. त्यांनी जो पहिला जाहीरनामा काढला त्यात ''कम्युनिस्ट पक्ष संघटित करा'' असेच आवाहन करण्यात आले होते. भारतीय कम्युनिस्ट पक्षाने हे आपल्या अस्तित्वालाच आव्हान मानले आणि पुढील काही वर्षात आपली सारी आग आणि आपल्यातील सारे विष रॉय व रॉयवादी यांच्या विरूध्द प्रचार करण्यासाठीच केंद्रित केले. कॉमिन्टर्नने त्यांना द्रव्य व मनुष्यबळ यांच्या सहाय्याने प्रभावी पाठिंबा दिला.

'द्रोही' रॉय त्यांना भारतात यश मिळवून द्यावयाला ते तयार नव्हते. भारतात परत आल्यानंतर आणि पुढे अनेक वर्षे रॉय यांना कडवे शत्रुत्व जर कोणापासून सहन करावे लागले असेल तर ते कम्युनिस्ट पक्ष, कॉमिन्टर्न आणि त्यांचे अनुयायी यांच्यापासूनच होय. रॉय यांची त्यासाठी पूर्ण तयारीच होती. पण तरीही हे शत्रुत्व इतके अप्रतिहत आणि विषारी होईल अशी मात्र त्यांची अपेक्षा नसेल.

रॉय भारतात परतले हे कम्युनिस्ट इंटरनॅशनलला मुळीच आवडले नाही. त्याला रॉय यांची दहशत वाटत होती. इंटेलिजन्स ब्यूरोने 'कम्युनिझम इन् इंडिया' या आपल्या प्रकाशनात त्याविषयी चिकित्सा करताना म्हटले आहे; ''कम्युनिस्ट इंटरनॅशनलला भीती वाटत होती की रॉय हे आपली राजकीय प्रज्ञा, संघटन कौशल्य, नेतृत्वाची पात्रता आणि सर्वात महत्वाचे म्हणजे आपले असामान्य व्यक्तित्व या सर्व गोष्टी चांगल्या रीतीने उपयोगी लावतील व डाव्या गटाच्या लोकांना आपल्याकडे आकर्षित करून परभृत कम्युनिस्ट चळवळ अधिकच दुबळी करतील.''[2] या परिस्थितीला तोंड देण्यासाठी इंटरनॅशनलने 1930 ते 1932 सालांच्या दरम्यान रॉयवादी कार्याचा प्रतिकार करण्यासाठी आपले बरेच हस्तक भारतात पाठविले. त्यांच्यापाशी मुबलक द्रव्य होते. ते त्यांनी कम्युनिस्ट पक्षाच्या हवाली केले. पण तरीही कम्युनिस्टांना यश संपादन करता आले नाही. त्यांना त्यावेळी 'अधिकृत' कम्युनिस्ट म्हणण्यात येत असे ते रॉयिस्टांपासून त्यांना वेगळे करण्यासाठी कारण रॉयवादी हेही कम्युनिस्ट म्हणून ओळखले जात असत.

रॉय परतले तेव्हा सविनय कायदेभंगाच्या चळवळीला उतरती कळा लागली होती. रॉय गटाने रॉय जाहीरनाम्याच्या आधारे काँग्रेसजनात प्रचार करून व प्रतिकारात्मक निषेध प्रगट करून त्या चळवळीत जीव ओतण्याचा प्रयत्न केला. त्या हेतूने त्या गटाने युवक संघ, नव जवान भारत सभा आणि इंडिपेंडन्स ऑफ इंडिया कमिटी या सारख्या संघटना उभ्या केल्या. अखेरीस गांधी-आयर्विन कराराच्या पायावर कायदेभंगाची मोहीम मागे घेण्यात आली. काँग्रेसचे त्या कराराला मंजुरी देण्यासाठी कराची येथे अधिवेशन भरले. रॉय हे त्या कराराच्या विरूध्द होते आणि त्यांच्या सूचनेनुसार हा करार रद्द करण्याची मागणी करणारी एक उपसूचना अधिवेशनात मांडण्यात आली. एक रॉयवादी तय्यब शेख यांनी या उपसूचनेची तरफदारी करणारे भावनोत्कट भाषण केले. पण तिला मुळीच पाठिंबा मिळाला नाही. त्यानंतर गांधीजी काँग्रेसचे एकमेव प्रतिनिधी म्हणून लंडनमधील गोलमेज परिषदेला गेले. रॉयवाद्यांनी गोलमेज परिषदेविरूध्द बराच प्रचार केला. त्या प्रचाराचा गाभा असा होता की ब्रिटिश सरकारने भरविलेल्या परिषदेत नव्हे तर लोकांनी

निवडून दिलेल्या घटना परिषदेतच देशाच्या घटनेची आखणी केली जाईल. रॉय यांना आनंद झाला की या प्रचारामुळे व इतर कार्यामुळे डावे कॉंग्रेसजन आपल्या गटाकडे आकर्षित होत आहेत.

उत्तर प्रदेशातील असंतोष त्यावेळी उफाळून निघाला होता. शेतीच्या उत्पादनाच्या किंमती घसरल्यामुळे शेतकरी हवालदिल झाले होते. जमीनदाराना खंड देणे त्याना अवघड झाले होते. जवाहरलाल नेहरू यांच्यासारख्या नेत्यांमुळे कॉंग्रेस खेडोपाडी पसरली होती. तिने शेतकऱ्यांची बाजू उचलून धरली आणि विशिष्ट किमान दरापलीकडे खंड न भरण्याचा शेतकऱ्यांना सल्ला दिला. रॉय भारतात पोचलेल्या सुमारास उत्तर प्रदेशात खंडबंदीची मोहीम आकार घेत होती. रॉय यांना शेतकऱ्यांचे आंदोलन उभारण्यासाठी ही सुवर्णसंधीच वाटली. नेहरू व इतर कॉंग्रेस नेत्यांना त्यांनी या कामी आपल्या सहाय्याची ग्वाही दिली. ते त्यांच्या बरोबर दूरदूरवर दौऱ्यावर गेले. त्यांनी अनेक गावांना भेटी दिल्या आणि असंख्य शेतकऱ्यांशीही चर्चा केली. त्यावेळी खादीच्या कपड्यात ते हिंडत असत आणि ते बॅनर्जी म्हणून ओळखले जात असत.

कामकरी संघटना रॉय आले त्या सुमारास विस्कळीत झालेली होती. कम्युनिस्टांनी ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस दुभंगली होती आणि नंतर संघटनांमध्ये दुफळी पाडण्याच्या आणि लाल संघटना बनविण्याच्या आपल्या धोरणानुसार त्या संघटनेच्या परिणामकारी कार्यात खंड पाडला होता. सत्ता गाजविणे किंवा नाश करणे हेच कम्युनिस्टांच्या धोरणाचे सूत्र होते. त्यांनी बरेच बेजबाबदार संप सुरू केले. कामगारांचे त्यामुळे नीतीधैर्य खचल्यासारखे झाले. ही परिस्थिती सुधारण्यासाठी रॉय यांनी कामकरी संघटनांच्या एकीकरणाची मोहीम काढली. त्यांनी एक कार्यक्रम तयार केला व एकीचे व्यासपीठ असे त्याला नाव दिले. तो प्रयत्न लगेच यशस्वी झाला नाही. पण कालांतराने जी एकी प्रस्थापित झाली तीत या व्यासपीठाने महत्वाचा वाटा उचलला. अटकेपूर्वी रॉय यांनी एका बाबतीत यश मिळविले. त्यांनी 'ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस' कम्युनिस्टांच्या कचाटीतून सोडविली. जुलै 1931 मध्ये कलकत्ता येथे कॉंग्रेसचे वार्षिक अधिवेशन भरले त्यात ही गोष्ट घडून आली. कम्युनिस्ट नंतर ट्रेड युनियन कॉंग्रेस मधून बाहेर पडले व त्यानी 'लाल ट्रेड युनियन कॉंग्रेस' ही नवी संघटना स्थापन केली. पुढील एक दोन वर्षे या संघटनेने आपल्या दरिद्री जीवनाचे अस्तित्व कायम ठेवले.

भारतामध्ये त्यांनी जे पाहिले ते रॉय यांना मुळीच आनंददायक वाटले नाही. त्यांना ही जाणीव झाली की वृत्तपत्रानी कायदेभंगाच्या आंदोलनाच्या व्याप्तीबद्दल आणि तीव्रतेबद्दल अतिरंजित वृत्त दिले होते. तितक्याच अतिरंजित स्वतः रॉय यांच्या कामगारांच्या लढाऊपणाबद्दल व वर्ग जागृततेबद्दल कल्पना होत्या. त्यांना साहजिकच वास्तव परिस्थितीशी जुळवून घ्यावे लागले. त्यांना

हेही मान्य करावे लागले की महात्म्याचा अद्यापही जनता जनार्दनावर कल्पनातीत प्रभाव आहे. त्यांना जाणीव झाली की आपल्या पुढील कार्य अति अति बिकट आहे. पण रॉय ही मनोधैर्य खचू देणारी व्यक्ती नव्हती. त्यांच्या मार्गात अनेक अडथळे होते. एक अडथळा म्हणजे अधिकृत कम्युनिस्ट त्यांच्या प्रभावाखाली असलेल्या लोकांचा कडवा विरोध. त्या दिवसात कम्युनिझम व कॉमिन्टर्न यांचे सर्व डाव्या गटातील लोकात मोठेच आकर्षण होते. दुसरा अडथळा म्हणजे रॉय यांचा गांधीवादी कार्यक्रम व नेतृत्व यांना असलेला निर्भीड विरोध. हे अडथळे न जुमानता रॉय यांनी पोलिसांचा सतत पाठलाग असतानाही पुष्कळसे कार्य करण्यात यश मिळविले.

अखेरीस पोलिसानी रॉय यांच्यावर झडप घातली आणि आधीच नमूद केल्याप्रमाणे 21 जुलै 1931 रोजी मुंबई येथे त्यांना अटक करण्यात आली. त्यांना तात्काळ कानपूर येथे नेण्यात आले. कानपूर कम्युनिस्ट कटात सामील असल्याबद्दल त्यांच्यावर पुढे खटला चालविण्यात आला. त्यांचा खटलाही जुन्या पुराव्याच्या आधारे चालविला गेला. खटल्याची सुनावणी तुरूंगातच पार पाडण्यात आली. कारण सरकार सार्वजनिक निदर्शने टाळू पाहात होते. रॉय याना कोर्टापुढे निवेदनही करू दिले गेले नाही. आश्चर्य असे की त्याच सुमारास मीरत कम्युनिस्ट कटाच्या खटल्यातील आरोपीना लांबलचक निवेदन करण्याची परवानगी देण्यात आली होती आणि न्यायाधीश अगदी कर्तव्यबुध्दीने त्यातील शब्द् शब्द टिपून घेत होते. बारा वर्षांची जी सजा रॉय याना देण्यात आली ती सुध्दा 1924 साली देण्यात आलेल्या चार वर्षांच्या सजेच्या तुलनेत रानटीच होती. नंतर अपीलात ती सहा वर्षांपर्यंत कमी करण्यात आली. एवढे खरे की साम्राज्यशाहीने अखेरीस आपल्या सर्वात प्रबळ शत्रूला ज्याची ती 1915 सालापासून शिकार करू पाहात होती कारावासात पाठविण्यात यश मिळविले. रॉय हे तुरूंगात खितपत पडले. साम्राज्यशाहीला आता असे वाटले असेल की आता काही वर्षे तरी रॉय हे आणखी काही ताप देण्याच्या दृष्टीने असमर्थ ठरतील.

ती अपेक्षा फलद्रूप झाली नाही. कारण सरकारने रॉय यांची कल्पकता आणि वॉर्डर्स आणि इतर तुरूंगातील अधिकारी आणि सामान्य तसेच राजकीय कैदी यांची सहानुभूती व सहाय्य संपादन करण्याची त्यांची कुशलता याचा विचार केला नव्हता. तुरुंगात गेल्यानंतर एक दोन आठवड्यांच्या आत रॉय यांनी बाहेरच्या जगाशी संबंध जुळविला. हे संबंध वॉर्डर्स बदलल्यामुळे आणि स्वत: रॉय यांची निरनिराळ्या तुरूंगात बदली झाल्यामुळे अनेक वेळा तुटले. पण या ना त्या रीतीने तुरूंगवासाच्या सबंध काळात ते जुळविले गेल्याशिवाय राहिले नाहीत. रॉय यांनी त्या सबंधाचा उपयोग पत्रे, जाहीरनामे, लेख आणि एक दोन पुस्तकांची हस्तलिखिते पाठविण्यात केला. 1935 साली

'एस्. के. विद्यार्थी' या नावाने 'चायना इन रिव्होल्ट' हे जे पुस्तक प्रसिध्द करण्यात आले ते तुरुंगातून चोरून पाठविलेले होते. 1941 साली ते 'माय एक्सपीरिअन्सेस इन चायना' या नावाने रॉय यांचे पुस्तक म्हणून पुन्हा प्रकाशित करण्यात आले. 'अवर टास्क इन इंडिया' हे पुस्तक हा रॉयवादी क्रांतिकारक जनता पक्षाचा जाहीरनामा झाला. तो रॉय यांनी तुरुंगात तयार करून गुप्तपणे बाहेर पाठविला होता. रॉय यांचे बचावाचे जे निवेदन न्यायालयात करू देण्यात आले नव्हते. तेही असेच गुप्तपणे बाहेर पाठविण्यात आले व 'माय डिफेन्स' या नावाने प्रकाशित करण्यात आले. जी पत्रे त्यांनी बाहेर पाठविली त्यातील अत्यंत प्रसिध्द म्हणजे 'लेटर्स टू काँग्रेस सोशालिस्ट पार्टी' ही होत. त्यांनी एक दोन पत्रे जवाहरलाल नेहरू याना पाठविली असेही नमूद करण्यात आले आहे. इतरही काही पत्रे बाहेर आली. रॉय यांनी काही लेखही असेच पाठविले आणि ते पुण्याच्या 'मराठा'मध्ये आणि मुंबईच्या 'ॲडव्होकेट'मध्ये प्रसिध्द करण्यात आले. या सर्व बेकायदा हालचालींची यादी देण्याचे प्रयोजन नाही. लक्षात ठेवण्यासारखा मुद्दा आहे, तो हा की रॉय वा त्यांचे मदतनीस हे एकदाही उघडकीस आले नाहीत. तुरूंगाचे सुपरिटेंडंट वा इतर अधिकारी यांना अनेक लोकांबद्दल संशय वाटत असे. त्यांच्यापैकी काहींच्या बदल्याही होत. पण त्यांच्या विरुध्द कोणताही पुरावा मात्र आढळून देत नसे. रॉय यांच्या कोठडीची अनेक वेळा झडती झाली. काही काळ लेखनाबद्दलच्या त्यांच्या सवलतीही काढून घेण्यात आला. पण त्यांच्या विरुध्द काहीही सिध्द होत नसे. त्यांच्या मदतनीसात काही राजकीय कैदी होते आणि काही वॉर्डर्स व सामान्य कैदीही पुढील काही वर्षात त्यांच्यापैकी काहीजण सभासंमेलनात रॉय यांचा संपर्क साधीत असत आणि रॉय प्रत्येक वेळी त्यांच्याशी सहृदयतेने व सौहार्दाने वागत असत.

साधारणपणे रॉय सद्वर्तनी कैदी होते. ते तुरुंगाचे सारे नियम कटाक्षाने पाळीत असत. दिलेले काम न चुकता ते पार पाडीत असत. पण सुरूवातीपासून त्यांनी एका नियमाचे पालन न करण्याचे ठरविले होते; तो नियम म्हणजे बाहेरच्या जगाशी कोणत्याही संपर्क न ठेवणे हा होता. तुरूंगवासाच्या सबंध काळात त्यानी या नियमाचा सतत भंग केला. तो नियम मोडूनच त्यांना प्रकाशनासाठी साहित्य पाठविता आले. त्याचप्रमाणे जे लोक त्यांच्याकडे नेतृत्वासाठी पहात होते त्यांचे मार्गदर्शन करता आले.

अधिकृतपणे रॉय यांना महिन्यातून एकच पत्र लिहिता येत असे. त्या पत्राची लांबी ठरवून देण्यात आलेली होती आणि काही वेळी आक्षेपार्ह ठरविला जाणारा मजकूर खोडूनही टाकलेला असे. रॉय हे ते पत्र त्यांची मैत्रीण आणि सहकारी एलन गॉटशॉक यांना लिहीत असत. रॉय तुरूंगातून सुटल्यानंतर एलन भारतात आल्या, रॉय यांच्याशी त्यांनी विवाह केला आणि

भारत हे आपले घर केले. एलन यांनी ती पत्रे जतन केली. 1941 साली 'लेटर्स फ्रॉम जेल' या नावाने ती प्रकाशित करण्यात आली. 'लेटर्स फ्रॉम जेल' हे एक मोहवून टाकणारे पुस्तक आहे. त्या पुस्तकात रॉय यांच्या राजकारण व्यतिरिक्त व मानवी स्वभावातील पैलूंचे दर्शन घडते. रॉय किती सुसंस्कृत व भावनोत्कट व्यक्तिमत्व होते हे तर त्यातून कळतेच पण रॉय यांची विद्वत्ता, व्यासंग आणि सर्वस्पर्शी गुणग्राहकता हीही त्यातून प्रगट होते.

तुरूंगातील जीवनाने रॉय यांचे आरोग्य ढासळले. आपल्या पोलादी शरीर प्रकृतीचा त्याना अभिमान वाटत असे. पण तुरूंगातील यातना त्या शरीरप्रकृतीला सहन झाल्या नाहीत. सर्वांना असह्य होता तो उन्हाळ्याचा ताप. पहिली तीन वर्षे त्याना कानपूर व बरेली येथील भयानक उष्णता सहन करावी लागली. त्यांनी स्वत: आणि भारत युरोप व अमेरिका यातील त्यांच्या मित्रांनी सरकारकडे अनेक अर्जविनंत्या केल्या. पण तरीही त्यांना पर्वत शिखरावरील थंड हवेच्या ठिकाणी पाठविण्यात आले नाही. 1934 साली चिंताजनक होण्याइतकी त्यांची प्रकृती बिघडली. त्यानंतर मात्र उन्हाळ्याच्या महिन्यात त्यांना अलमोडा येथे हलविण्यात आले. उन्हाळा संपताच त्यांना पुन्हा बरेली येथे आणण्यात आले. दुसऱ्या वर्षी हवा ऊष्ण होताच त्यांना देहराडून येथे नेण्यात आले आणि सुटका होईपर्यंत तेथेच ठेवण्यात आले.

रॉय यांना बारीक ताप, छातीतून कळा येणे आणि काहीसा हृदयविकार यांचा मधूनमधून त्रास होत असे. भारत आणि जगातील नामवंत व्यक्तींनी-जगप्रसिध्द शास्त्रज्ञ आल्बर्ट आइनस्टाइन यांच्यासह-भारत सरकारला पत्रे लिहून रॉय यांना सहृदयतेची वागणूक देण्याची मागणी केली. जवाहरलाल नेहरू यांनीही त्या प्रश्नात जातीने लक्ष पुरविले. पण त्या सर्वांचा काहीही परिणाम झाला नाही. खटला चालू असताना रॉय हे 'अ' वर्गाचे कैदी होते. शिक्षेनंतर त्यांना 'ब' वर्ग देण्यात आला. रॉय व बाहेरच्या मित्रांनी गळ घातल्यानंतरही हे वर्गीकरण बदलले नाही.

प्रकृतीचे अस्वास्थ्य असतानाही रॉय यानी कायदेशीर स्वरूपाचे तुरूंगात बरेच लेखन केले. लेखनासाठी त्यांना एका वेळी एकच वही देण्यात येत असे. क्रमांक घातलेली आणि अधिकृतपणे देण्यात आलेली ही वही असे. पहिली वही तुरूंगाधिकाऱ्यांच्या ताब्यात दिल्यानंतरच नवी वही त्यांना दिली जाई. गंभीर स्वरूपाच्या अभ्यासाच्या दृष्टीने ही व्यवस्था असमाधानकारक होती. पण या सर्व अडचणी न जुमानता रॉय यानी सुमारे हजार पानांचे एक नोटबुक याप्रमाणे नऊ नोटबुके लिहून काढली. सुटकेनंतर त्यांनी ते सारे साहित्य बाहेर आणले. त्यापैकी काही साहित्य पुस्तकरूपाने प्रसिध्द करण्यात आले. 'फॅसिझम' 'मटीरियालिझम', 'हिस्टॉरिकल रोल ऑफ इस्लाम',

'आयडियल ऑफ इंडियन वुमनहूड' ही रॉय यांच्या हस्तलिखितातून तयार करण्यात आलेली पुस्तके होत. एक खंड अद्याप प्रकाशित झालेला नाही. आधुनिक विज्ञानाचे तात्विक परिणाम या विषयावरील रॉय यांच्या लेखनाचा तो खंड होय.

रॉय यांच्या अटकेमुळे रॉय गट नामशेष झाला नाही. त्याने राजकीय व कामकरी क्षेत्रातील आपले कार्य चालू ठेवले. इतकेच नव्हे तर विकसित केले. भारत सरकारच्या इंटेलिजन्स ब्यूरोने 'हिस्टरी ऑफ द कम्युनिस्ट पार्टी ऑफ इंडिया' या पुस्तकात या गटाच्या कार्याचे खालील प्रमाणे वर्णन केले आहे: ''रॉय यानी युरोपमधून भारतात जे दूत तयार केले होते. त्यापैकी बहुतेक सर्वांनी रॉयचा त्याग करून कॉमिन्टर्नशी आपली निष्ठा कायम ठेवली. तथापी 1934 सालच्या अखेरीस रॉय यांच्या नव्या अनुयायांनी आपल्या कार्यात फार मोठे यश संपादन केले होते. त्यानी 'ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस'मधील आपले स्थान बळकट केले होते. चाळीस कामगार संघटना तिच्याशी जोडल्या होत्या आणि कलकत्ता येथे कायमची कचेरी प्रस्थापित केली होती. 'ए.आय.टी.यू.सी.' हळूहळू देशातील कामकरी संघटनेचा नेता व स्फूर्तिदाता म्हणून आपली पूर्वीची प्रतिष्ठा मिळवू लागली होती.'' त्यानंतर या पुस्तकात रॉय यांचे खालीलप्रमाणे गौरवपर मूल्यमापन करण्यात आले आहे: ''परत आल्यानंतर जो काही थोडासा काळ रॉय यानी भारतात काढला, त्या अल्पावधीत त्यानी एक हाती कार्याचा जो उठाव केला, तो रॉय यांच्या लोकोत्तर कल्पकतेलाच साधण्यासारखा होता. खुद्द तुरूंगातूनही त्यांनी आपल्या अनुयायांचे मार्गदर्शन केले. त्यांना स्फूर्ती दिली. गेल्या काही वर्षातील कम्युनिस्ट चळवळीतील प्रगती पाहता रॉय यानी पुरस्कारिलेले ध्येयधोरण किती अचूक होते. त्याचा प्रत्यय आल्यावाचून रहात नाही.''[3]

देशविदेशातील राजकीय चळवळीबद्दल रॉय यांना तुरूंगात असतानाही पुरेपूर माहिती असे. कारावासाच्या काळात अनेक घडामोडी घडल्या होत्या. त्यांनी त्याबद्दल विचार केला होता आणि नव्या परिस्थितीत कृतीचे कोणते धोरण आखण्यात यावे याचीही त्यांनी योजना आखली होती. सुटकेनंतर सर्वसाधारणपणे परिस्थिती विचारात घेण्यासाठी अवधी मागून घेण्याची प्रथा असते. रॉय यांनी ती प्रथा चालू ठेवली नाही. त्यांच्याकडे उत्तरे तयार होती. त्यांनी राजकीय रिंगणात कोठलाही संकोच न ठेवता उडी घेतली. कारागृहाच्या भिंतीना सुध्दा जे राजकीय कार्य थांबविता आले नाही ते राजकीय कार्य पुढे चालविण्याच्या निर्धाराने त्यांनी राजकारणात प्रवेश केला.

## टीपा

1. ए. के. हिंदी यांच्या *एम. एन. रॉय : द मॅन हू लुक्ड अहेड* या मॉडर्न पब्लिशिंग हाऊस अहमदाबाद यांनी 1938 साली प्रकाशित केलेल्या पुस्तकावर आणि रॉय यांच्या *इंडिपेंडेंट इंडिया* या साप्ताहिकावर हे प्रकरण आधारित आहे.
2. *कम्युनिझम इन इंडिया*, इंटेलिजन्स ब्युरो पब्लिकेशन, पृ. 148.
3. *अ हिस्ट्री ऑफ सी. पी. आय.* खंड I, 1917-1943, गव्हर्मेंट ऑफ इंडिया, इंटेलिजन्स ब्युरो, पृ. 69 ते 71.

# कॉंग्रेसमध्ये व बाहेर

रॉय यांची 20 नोव्हेंबर 1936 रोजी सकाळी देहराडूनच्या तुरूंगातून पाच वर्षे आणि चार महिन्यांच्या कारावासानंतर मुक्तता झाली. तुरूंगाच्या दारात काही कॉंग्रेस पुढाऱ्यांनी त्यांचे स्वागत केले. पण त्यांच्या दुर्बल प्रकृतीचा विचार करून निदर्शने टाळण्यात आली.

सुटकेनंतर रॉय यांना म्युनिसिपॅलिटीचे अध्यक्ष व प्रमुख कॉंग्रेस पुढारी खुर्शीद लाल यांच्या निवासस्थानी नेण्यात आले. तेथे त्यांना नेहरूंचा संदेश मिळाला. नेहरूंनी त्यांना बरेली येथे भरणाऱ्या प्रांतिक राजकीय परिषदेत भाग घेण्यासाठी आणि नंतर आपल्या निवासस्थानी विश्रांती व शरीरस्वास्थ्य सुधारणे या दोन गोष्टींसाठी येऊन राहण्याचे आमंत्रण दिले होते. रॉय यांचे देशाच्या अनेक भागातील सहकारी येथे त्यांच्या भेटीगाठी आणि स्वागतासाठी आले होते. रॉय यांना त्यांच्या भेटीचा फार आनंद झाला.

वृत्तपत्रांचे प्रतिनिधी रॉय यांना भेटण्यासाठी आणि त्यांच्याकडून त्यांची ताबडतोबीची योजना व कार्यक्रम समजावून घेण्यासाठी उत्सुक होते. त्यांच्या आग्रहाखातर रॉय यानी एक लहानसे निवेदन केले. ते खालीलप्रमाणे होते: ''सहा वर्षाच्या दीर्घकालीन कारावासानंतर भारतातील लोकांना उद्देशून चार शब्द बोलण्यास मला फार आनंद होत आहे. साम्राज्यशाहीकडून पिळल्या जाणाऱ्या या सहकारी मित्राना माझा संदेश आहे: राष्ट्रीय कॉंग्रेसच्या झेंड्याखाली लक्षावधींच्या संख्येने उभे रहा. लोकशाही स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या सैन्याचे निर्धाराने सैनिक तुम्हाला झाले पाहिजे. सर्वांच्या आकांक्षा ज्या ध्येयावर खिळलेल्या आहेत ते ध्येय साध्य करण्यासाठी त्या स्वातंत्र्याचे स्पष्ट चित्र तर आपल्या डोळ्यासमोर उभे राहिले पाहिजेच पण कृतीची एक निश्चित योजनाही आपल्यासमोर उभी हवी आहे. स्वातंत्र्यासाठी ते आवश्यक वातावरण तयार करण्यासाठी मी झटेन. मला यावेळी जाहीर करणे श्रेयस्कर वाटते की समाजवाद का कम्युनिझम ज्याचा अर्थ एकच आहे- हा आजचा प्रश्न नाही. खऱ्याखुऱ्या समाजवाद्यांनी - कम्युनिस्टांनी जाणीव ठेवली पाहिजे की भारतातील जनतेच्या स्वातंत्र्यासाठी चाललेल्या लढाईत त्यांना भाग घ्यावयाचा असेल तर राष्ट्रीय स्वातंत्र्य हेच तात्कालिक उद्दिष्ट होय. सर्व साम्राज्यशाही विरोधी शक्तींना लोकांचे, लोकांनी चालविलेले सरकार प्रस्थापित करण्यासाठी लोकशाही स्वातंत्र्याच्या घोषणेखाली एकत्र आणले पाहिजे. राष्ट्रीय कॉंग्रेस

हे आपले सर्वांचे समान व्यासपीठ आहे. मी औपचारिक रीतीने काँग्रेसशी जोडला गेलेला नाही. पण गेली कित्येक वर्षे काँग्रेसला अधिक जहाल आणि लोकशाहीवादी बनवून तिला मजबूत करण्यासाठी मी झटत आलो आहे. आणि यापुढे माझे कार्य अधिक सुखकर व्हावे म्हणून काँग्रेसमध्ये औपचारिकपणे मी सामील होणार आहे. भारताच्या लोकांना मला हे दाखवून द्यावयाचे आहे की कम्युनिस्ट हे भारताच्या राजकीय जीवनातील कोणी उपरे लोक नसून 'इंडियन नॅशनल काँग्रेस'च्या निशाणाखाली लढणाऱ्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या सेनेतील, भूमिपुत्रांपैकी आघाडीचे वीर आहेत.''[1]

त्याच संध्याकाळी राजकीय परिषदेला हजर राहण्यासाठी त्याचप्रमाणे नेहरूना भेटण्यासाठी रॉय बरेलीला जावयाला निघाले. बरेलीमध्ये त्यांना काँग्रेसचे सभासद करून घेण्यात आले आणि फैजपूर काँग्रेस अधिवेशनाचे प्रतिनिधी, ऑल इंडिया काँग्रेस समितीचे सभासद आणि उत्तर प्रदेश काँग्रेस समितीच्या कार्यकारी मंडळाचे सभासद म्हणून निवडण्यात आले. अशा रीतीने रॉय यांच्या काँग्रेसमधील जीवनाला सुरूवात झाली. त्यांनी सतत कम्युनिस्टांना काँग्रेसमध्ये प्रवेश करून काँग्रेसमध्ये चैतन्य आणण्यासाठी तिचे स्वरूप अधिक जहाल करण्यासाठी कार्य करण्याचा सल्ला दिला होता. त्या प्रश्नावर त्यांनी कॉमिन्टर्नशी फारकत करून घेतली होती आणि काँग्रेसवर बहिष्कार घालण्याचेच व तिच्याशी लढा करण्याचे धोरण अति-डावे व साहसवादी ठरविले होते. आता प्रथमच काँग्रेसमध्ये प्रवेश करून तेथे कार्य करण्याची त्याना संधी मिळाली होती.

त्यानंतर रॉय हे 1936 च्या डिसेंबरमध्ये भरलेल्या फैजपूर काँग्रेसला हजर राहिले. नेहरू या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. आपल्या अध्यक्षीय भाषणात नेहरूंनी रॉय यांचा खास उल्लेख केला आणि स्वातंत्र्याचे एक प्रभावी योध्दे म्हणून काँग्रेसच्या वर्तुळातील त्यांच्या प्रवेशाचे स्वागत केले. रॉय यांना उच्च व्यासपीठावर स्थान देण्यात आले आणि नेतानिवासात त्यांच्यासाठी एक खास झोपडी राखून ठेवण्यात आली. अधिवेशनात रॉय यांनी विषयनियामक समितीच्या बैठकीत घटना परिषदेवर भाषण केले होते. लोकांच्या भावना प्रक्षुब्ध करण्याचा त्यांनी अणुमात्रही प्रयत्न केला नाही. विवेकाला आणि तर्कशुध्दतेला त्यात आवाहन करण्यात आले होते. रॉय यांनी आपल्या भाषणात दिग्दर्शित केले की घटनात्मक सुधारणा जर परिणामकारक रीतीने झिडकारून टाकावयाच्या असतील तर काँग्रेसने सत्ता काबीज करण्याच्या दृष्टीने विचार सुरू केला पाहिजे. त्यांनी काँग्रेस समित्या या सत्तेची साधने म्हणून कशा विकसित करता येतील याचे मार्गदर्शन केले आणि म्हटले की काँग्रेसने स्वतःच घटना परिषद म्हणून कार्य करावयाला सुरूवात केली पाहिजे. राष्ट्रीय लढ्यात बहुसंख्य

जनतेला ओढण्याच्या दृष्टीने त्यांनी कृतीचा एक निश्चित कार्यक्रम काँग्रेसपुढे ठेवला. त्यांचा असा युक्तिवाद होता की जनतेच्या दैनंदिन मागण्यांसाठी होणारा संघर्ष हा राष्ट्रीय लढ्याशी समरस केला गेला पाहिजे.

या भाषणाने श्रोत्यांवर फार मोठी छाप टाकली. डाव्या विचारसरणीचे जे विचारवंत तेथे मोठ्या संख्येने उपस्थित होते त्यांचे तर या भाषणाने देहभान हरपून गेले. त्यांना असे वाटले की रॉय यांनी त्यांना हवा असलेला मार्ग त्यांच्यापुढे खुला केला आहे. जो क्रांतीकडे त्यांना घेऊन जाईल.

फैझपूरमध्ये रॉय यांची गांधीजींशी प्रथमच समोरासमोर भेट झाली. ती भेट तशी मैत्रीपूर्ण झाली. पण तीत त्या दोघांचे जे बोलणे झाले त्यातून त्या दोघांमधील दरी प्रगट झाली. रॉय यांना प्रार्थनेत सहभागी होण्याचेच आमंत्रण देण्यात आले होते. ते त्यांनी हळुवारपणे नाकारले. त्यातून एक प्रकारे काँग्रेसवर अधिसत्ता गाजविणाऱ्या गांधी परिवारात प्रवेश मिळण्याचा रस्ताच बंद झाला. या भेटीने काँग्रेसमध्ये प्रतिस्पर्धी नेतृत्व निर्माण करण्याच्या आवश्यकतेबद्दलच्या रॉय यांच्या कल्पनेला अधिकच बळकटी आली.

निवडणूकीची मोहीम फैझपूर अधिवेशनानंतर लगेच सुरू झाली. या निवडणुकी 1935 सालच्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टच्या अनुषंगाने अस्तित्वात येणाऱ्या नव्या प्रांतिक विधानसभांसाठी होणार होत्या. काँग्रेस त्या सुधारणांचा विध्वंस करण्यासाठी वचनबध्द होती. पण त्यांच्यावर बहिष्कार टाकण्याऐवजी त्या निवडणुकी लढविण्याचा काँग्रेसने निर्णय घेतला होता. रॉय यांनी महाराष्ट्र व कर्नाटकमधील निवडणूक मोहिमात भाग घेतला.

1937 सालच्या एप्रिलमध्ये रॉय यांनी 'इंडिपेंडंट इंडिया' या साप्ताहिकाचे प्रकाशन सुरू केले. या साप्ताहिकामुळे रॉय यांना दर आठवड्याला राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घडामोडींबद्दलची आपली मते स्पष्ट आणि निर्भीडपणे व्यक्त करण्याची संधी मिळाली. नेहरू आणि बोस यांनी त्या प्रकाशनाचे स्वागत केले. पण गांधीजींना विचारता त्यांनी रॉय यांना "मूकसेवा" करण्याचा सल्ला दिला. अर्थातच हा सल्ला मानण्यात आला नाही. रॉय यांच्या सुटकेनंतर रॉय गट जो बराच वाढला होता. त्याचे सभासद अधिकच कार्यक्षम झाले. त्या गटातल्या सभासदांची संख्या वाढली आणि राजकीय व कामकरी क्षेत्रात ती एक प्रबळ शक्तीही झाली.

या सुमारास रॉय हे तुरूंगातून ज्यांना वक्तशीरपणे पत्रे लिहीत असत त्या एलन गॉटशॉक भारतात आल्या. रॉय यांना कायमचे सहकारित्व देण्याच्या उद्देशाने त्या भारतात आल्या होत्या. लवकरच त्यांचा विवाह झाला आणि त्या एलन रॉय बनल्या. एलन यांनी प्रेमळ पत्नीचीच जागा घेतली नाही, तर एक बुध्दिमान सहायक आणि क्रांतिकार्यातील सहचरी म्हणूनही त्यांनी रॉय यांना सहाय्य दिले.

त्या वर्षात त्यांनी तमिळनाडू व आंध्रप्रदेशाचा दौरा केला. जेथे तेथे ते गेले तेथे त्यांनी काँग्रेस अधिक प्रभावी व लोकशाहीवादी करण्याचा संदेश दिला. 1938 च्या जानेवारी महिन्यात ते बंगालमध्ये गेले. आपल्या जन्मस्थानाला वीस वर्षानंतर दिलेली त्यांनी ही पहिलीच भेट होती. तेथे त्यांचे वीरोचित स्वागत झाले आणि जेथे तेथे त्यांनी भाषणे दिली. ती एकतानतेने लोकानी ऐकली. त्यांच्या आवाहनानुसार शेकडो डाव्या प्रवृत्तीच्या बुध्दिवंतांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला. त्यानंतर त्यानी बिहार व उत्तरप्रदेशचा खूप विस्तृत दौरा केला.

आत्तापर्यंत रॉय यानी डेहराडून येथे आपले घर केले होते. तो एक जुना, परित्यक्त बंगला होता. त्याच्या भोवती एक मोठे आवार होते आणि त्या आवारात उंचउंच वृक्ष, तशीच झुडुपेही होती. थोड्याच दिवसात ही झुडुपे काढून टाकण्यात येऊन आवारात एक सुंदर बाग तयार करण्यात आली. हे घर हे रॉय पतिपत्नींचे कायमचे निवासस्थान बनले. दरवर्षी देशभराच्या दौऱ्यानंतर ते तेथे परत येत असत. ही जागा शहरवस्तीपासून दूर होती व त्यामुळे रॉय यांना हवा असलेला निवांतपणा त्यांना तेथे मिळाला. पुढे काही वर्षांनी ते घर हे रॉयवाद्यांचेच नव्हे तर निरनिराळ्या क्षेत्रातील सामाजिक व राजकीय कार्यकर्त्यांचे तसेच भारतीय व परदेशी पंडितांचे आश्रयस्थान बनले. त्या घरात सर्वांचेच स्वागत होत असे व जे काही आदरातिथ्य करता येईल ते प्रेमाने केले जात असे.

काँग्रेसमधील आपले कार्य सुरू करण्यापूर्वी रॉय यांनी एका निवेदनामार्फत आपल्या भूमिकेचे स्पष्टीकरण केले. या निवेदनात रॉय म्हणतात: ''माझ्या राजकीय कार्याचे (प्रकृती व इतर कारणे यांची जितक्या लवकर व्यवस्था करता येईल ती झाल्यानंतर.) उद्दिष्ट साम्राज्यशाहीविरूध्द परिणामकारक लढा देण्याचे साधन म्हणून काँग्रेसला बळकटी आणणे हे होय. साम्राज्यशाहीच्या जोखडाखालून मुक्तता होणे आणि राजकीय त्याचप्रमाणे आर्थिक दृष्टीने देशाचे लोकशाहीकरण होणे या भारतीय समाजाच्या पुनर्रचनेसाठी अत्यंत आवश्यक अशा गोष्टी होत. ती पुनर्रचना अशा स्वरूपात झाली पाहिजे की ज्यात सामुदायिक दारिद्रय आणि त्यातून निर्माण होणाऱ्या दु:खद सांस्कृतिक, बौध्दिक आणि नैतिक अध:पाताला स्थान राहणार नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर काँग्रेसमधील अशा गटांची एकी आणि मजबुती करावयाचा मी प्रयत्न करीन की ज्यांना ही जाणीव झाली आहे की राष्ट्रीय स्वातंत्र्य ही त्यापेक्षाही अधिक मोठ्या स्वातंत्र्याच्या मार्गावरील फक्त एक आवश्यक अवस्था आहे.

''माझी ही ठाम समजूत आहे की साम्राज्यशाही विरूध्द परिणामकारक लढा हा क्रांतिकारक सामाजिक ध्येयातून स्फूर्ती घेणाऱ्या नेतृत्वाकडून लढविला जाईल. माझे असे मत आहे की स्वातंत्र्याबद्दलची नुसती पोपटपंची करून

आपल्याला मनोमनी जपलेले आपले ध्येय साध्य करून घेता येणार नाही. आपले ताबडतोबीचे उद्दिष्ट समाजवाद हे नव्हे; पण राजकीय स्वातंत्र्य आणि समाजवादाची प्रस्थापना ही एकमेकांपासून सर्वस्वी अलग असलेल्या इतिहासातील अवस्था आहेत असे समजणे चुकीचे आहे. जनतेच्या सर्व कळकळीच्या आणि कृतिशील हितचिंतकानी ही जाणीव ठेवली पाहिजे की भारतीय समाजाला पोखरून काढणाऱ्या आर्थिक अरिष्टांचे निर्मूलन करण्यासाठी जनतेच्या श्रमातून निर्माण होणाऱ्या उत्पादनाचा जास्तीत जास्त भाग संपत्तीचे जनक जे कामगार व शेतकरी यांच्याच हाती राहिला पाहिजे. म्हणून आपले इतिहासदत्त उद्दिष्ट साध्य करण्यासाठी राष्ट्रीय स्वातंत्र्य म्हणजे जनतेच्या हाती खरीखुरी सत्ता देणारी राजवट अशीच त्याची व्याख्या केली गेली पाहिजे. म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्य हे खरेखुरे लोकशाहीचे स्वातंत्र्य होईल या दृष्टीने त्याची उभारणी केली पाहिजे. राष्ट्रवादी चळवळीपुढे मी लोकशाहीवादी क्रांतीचा एक स्पष्ट कार्यक्रम आणि त्याच्या जोडीला कृतीची एक विधायक योजना सादर करणार आहे. साम्राज्यशाही विरोधी परिणामकारक लढा उभारण्याचा तोच एक मार्ग आहे. या लढ्यात भाग घेणाऱ्या लोकांना आपण कशासाठी लढत देत आहो हे निश्चितपणे कळले पाहिजे. प्रचार आणि निदर्शने यांच्या सहाय्याने आपण फार दूर जाऊ शकणार नाही. जनतेची राजकीय जागृती विकसित केली पाहिजे. साम्राज्यशाही विरोधी शक्ती स्पष्ट मागण्यांसाठी होणाऱ्या लढ्यातून संघटित झाल्या पाहिजेत. कॉंग्रेस संघटना आणि नेतृत्व यांचे लोकशाहीकरण झाले पाहिजे. त्यांना सामान्य कॉंग्रेसजनांच्या प्रभावाखाली आणले पाहिजे. मी त्या हेतूने कार्यरत राहेन.''[2]

रॉय यांच्या निवेदनाने कॉंग्रेसमधील उजव्या प्रवृत्तीच्या लोकांना आनंद झाला नाही. गांधीवादाला रॉय यांचा असलेला विरोधही त्याना माहीत होता. रॉय यांच्या कॉंग्रेसमधील प्रवेशाचे त्यांनी स्वागत केले नाही. पहिल्या काही आठवड्याच्या आत ते रॉय यांच्याकडे संशयाने पाहू लागले. लवकरच संशयाचे रूपांतर शत्रुत्वात झाले. रॉय यांना निरनिराळ्या ठिकाणच्या दौऱ्यात त्याचा प्रत्यय येऊ लागला. निरनिराळ्या प्रश्नावरील रॉय यांच्या सूचनांचा गुणवत्तेवर कधीच विचार झाला नाही. त्या सूचना बहुश: झिडकारून टाकल्या जात त्या या कारणासाठी की त्यां आमच्या मार्गाशी जुळणाऱ्या नव्हेत.

आश्चर्य असे की रॉय याना संघटित डाव्या प्रवृत्तींच्या गटांकडून तितकेच शत्रुत्व सोसावे लागले. कॉंग्रेस समाजवादी पक्ष हा त्यावेळी कॉंग्रेसमधील एक प्रबळ गट होता. हा पक्ष ही एक विचित्र राजकीय घटना होती. मूलभूत प्रश्नांवरही त्या पक्षाच्या नेतृत्वात मतभेद होते. तो पक्ष स्वत:ला समाजवादी पक्ष म्हणत असे. पण अद्यापही निवडणुकीवरील कायदेमंडळांवर

व अधिकारपदांवर बहिष्कार टाकणे यासारख्या गांधीवादी डावपेचांवर त्यांचा विश्वास असे. कॉंग्रेसच्या उजव्या प्रवृत्तींच्या नेतृत्वावर त्यांचे काही मूलभूत मतभेद नव्हते; त्या पक्षाची एवढीच इच्छा होती की कॉंग्रेसने गांधीवादी मार्गाचे अधिक परिणामकारक रीतीने आचरण करावे. त्या पक्षाचा रॉय यांच्यावर रोष होता तो यामुळे की रॉय यांना त्या पक्षाने समाजवादी पक्ष म्हणून नव्हे तर कॉंग्रेसमधील डावा गट म्हणून वावरावे आणि कॉंग्रेसमध्ये प्रतिस्पर्धी नेतृत्व निर्माण करण्यासाठी झटावे असे वाटत होते. या पक्षात सामील झालेल्या रॉय वा यापैकी अनेकांनी रॉय यांच्या सल्ल्यानुसार जेव्हा गटागटाने समाजवादी पक्षाचा त्याग केला, तेव्हा तर तो पक्ष रॉय यांच्यावर अधिकच रूष्ट झाला. रॉय यांचे सी. एस. पी. बद्दल मत थोडक्यात खालीलप्रमाणे होते: ''कॉंग्रेस समाजवादी पक्ष कॉंग्रेसमधील डाव्या गटाची संघटना आहे किंवा तो खराखुरा मार्क्सवादी समाजवादी पक्ष आहे. तो मार्क्सवादी पक्ष असेल तर त्याने कम्युनिस्ट पक्षाची कृतियोजना आणि संघटनात्मक पवित्रा स्वीकारला पाहिजे. त्याच्या उलट ती कॉंग्रेसमधील डाव्या गटाची संघटना असेल तर तो खरा समाजवादी पक्ष होऊच शकणार नाही. सध्याचा त्याचा कार्यक्रम आणि संघटनात्मक स्वरूप पाहिले तर सी. एस. पी हा सुधारणावादी सोशल डेमोक्रॅटिक पक्ष असल्याचा भास होतो. एकीकडे कॉंग्रेसमधील डाव्या गटाची संघटना बांधण्याच्या दृष्टीने तो उपयुक्त ठरत नाही. आणि दुसरीकडे कम्युनिस्ट पक्षाच्या विकासाला मात्र तो प्रतिबंध घालतो.''[3]

कम्युनिस्ट पक्षाचा गट हा तर रॉय यांचा त्याहीपेक्षा मोठा विरोधी राहिला. कॉंग्रेसमधील रॉय यांचा प्रभाव त्याला आवडला नाही. रॉय यांनी कॉंग्रेसमध्ये प्रवेश करण्याच्या सुमारास कम्युनिस्ट पक्षाने, मॉस्कोच्या आदेशानुसार कॉंग्रेस विरोधाचे धोरण सोडले होते आणि तो कॉंग्रेसमध्ये शिरून काम करू लागला होता. रॉय यांनीही जाहीर केले होते की सातव्या कॉंग्रेसने आपल्या भूमिकेत बदल केल्यानंतर त्यांचे कॉमिन्टर्नशी मतभेद राहिले नाहीत. त्या परिस्थितीत कम्युनिस्ट पक्षाने आपले सहकार्य रॉय यांना द्यावयाला पाहिजे होते. पण ते घडून आले नाही. कारण रॉय यांचे स्वतंत्र विचार मॉस्कोला परवडण्यासारखे नव्हते. त्यामुळे रॉय यांना कॉंग्रेसमधील कार्याच्या बाबतीत कम्युनिस्ट पक्षाकडून काहीच सहाय्य मिळाले नाही.

त्यानंतर डावपेच आणि धोरण याबद्दलच्या अनेक प्रश्नांवर त्या दोन पक्षांशी रॉय यांचे गंभीर मतभेद होते. सी.एस.पी आणि कम्युनिस्ट तसेच इतर डाव्या प्रवृत्तीचे लोक हे अधिकार स्वीकाराच्या विरूध्द होते. रॉय यांच्या दृष्टीने हा मामुली प्रश्न होता. पण त्यांचे असेही मत होते की अधिकारपदे निश्चित कार्यक्रमाच्या पायावर स्वीकारण्यात आली, तर त्यांचा

जनतेची शक्ती उफाळून आणण्याच्या, त्याचप्रमाणे ती संघटित करण्याच्या कामी उपयोग करून घेता येणे शक्य आहे.

कॉंग्रेसमध्ये सामुदायिक रीतीने प्रवेश करणे हा दुसरा मतभेदाचा प्रश्न होता. सी.एस्.पी आणि कम्युनिस्ट पक्ष यांची अशी इच्छा होती की कामगार व शेतकरी याना व्यक्तिशः कॉंग्रेसमध्ये प्रवेश न करता त्यांच्या संघटनाच कॉंग्रेसला जोडून घेण्यात याव्या. रॉय हे व्यक्तिगत सभादत्वाच्या बाजूचे होते. कारण त्याना वाटले की सामुदायिक प्रवेशामुळे कॉंग्रेस दुबळी होईल. पूर्वी त्यानी सामुदायिक प्रवेशाला अनुमती दिली होती. पण विचारांती त्यानी आपले मत बदलले होते. आणखी एक गतभेद किसान सभा संघटित करण्याच्या प्रश्नावर होता. रॉय यांचे असे मत होते की खेड्यातील कॉंग्रस समित्यानींच किसान सभा म्हणून काम करावे. इतराना किसान सभा या स्वतंत्र संघटना म्हणून अस्तित्वात याव्या असे वाटत होते. अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण मतभेद जर कोणता असेल तर तो नेतृत्वाच्या प्रश्नावर होता. रॉय हे प्रतिस्पर्धी नेतृत्वाचा आग्रह धरीत होते, तर इतराना सध्याच्या आस्तित्वात असलेल्या नेतृत्वात फक्त काही बदल हवे होते. या मतभेदांमुळे रॉय गट व सी.एस्.पी. आणि कम्युनिस्ट पक्ष यांच्यामध्ये समान भूमिका निर्माण होण्याची शक्यताच दुरावली गेली.[4]

सुभाषचंद्र बोस यांची दुसऱ्यादा कॉंग्रेस अध्यक्ष म्हणून निवड झाली ती 1938 साली. महात्मा गांधी यांची इच्छा न जुमानता ही निवड झाली. तिच्यामुळे कॉंग्रेसमध्ये खळबळ उडाली. जुन्या नेतृत्वाने सुभाषबाबूंना सहकार्य करण्याचे नाकारल्यानंतर रॉय याना कॉंग्रेसमध्ये प्रतिस्पर्धी नेतृत्व निर्माण करण्याची ही संधीच वाटली. सी.एस्.पी. व कम्युनिस्ट पक्ष यानी त्या मताचा स्वीकार केला नाही; पुढे बोस यानी राजीनामा दिला आणि जुन्या गांधीवादी नेतृत्वाने संघटनेवरील आपली पकड पुन्हा प्रस्थापित केली. त्यातून रॉय याना कॉंग्रेसमधील आपल्या अनुयायाना एका संघटनेत गोवण्याची प्रेरणा मिळाली. त्या संघटनेला 'लीग ऑफ रेडिकल कॉंग्रेसमेन' असे नाव देण्यात आले. त्या संघटनेचे उद्घाटन 1938 मध्ये पुणे येथे झाले. त्या संघटनेचा कार्यक्रम कॉंग्रेस सारखाच होता. फक्त त्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी चैतन्यपूर्ण कृती करण्यात यावी अशी त्या संघटनेची मागणी होती. तिच्या जोडीला नेतृत्वात बदल करण्याचीही संघटनेने मागणी केली. लीगला देशभर बराच पाठिंबा मिळाला. पुढे बोस यानी फॉरवर्ड ब्लॉकची स्थापना केली. सुरूवातीला अशी अपेक्षा होती की कॉंग्रेसमधील सर्व डावे गट या संघटनेत एकत्र येतील. पण तसे घडून आले नाही आणि फॉरवर्ड ब्लॉक हा आणखी एक डावा गट झाला.

1940 साली रॉय यानी कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठी निवडणूक लढविली. त्यानी यशस्वी होण्याच्या अपेक्षेने ही निवडणूक लढविली असे मुळीच नव्हे. त्याना या निवडणुकीमार्फत कॉंग्रेसमधील सर्वोच्च पदासाठी नेतृत्वाविरूध्द मतभेद प्रगट करणाऱ्या व्यक्तीनाही निवडणूक लढविण्याचा हक्क आहे हे ठासून मांडावयाचे होते. रॉय यांनी प्रतिस्पर्धी नेतृत्व प्रस्थापित करणे आवश्यक आहे या भूमिकेवर ही निवडणूक लढविली. इतर डाव्या गटांनी त्यांना पाठिंबा दिला नाही. पण त्यांनी या निवडणुकीत दहा टक्के मते मिळविली.

रॉय यांनी कॉंग्रेसमधील आपल्या कार्याला मोठे महत्त्व दिले. पण त्यांना आकर्षित करणारी तेवढी एकच गोष्ट नव्हती. त्यांनी कामकरी संघटनेकडे त्याचप्रमाणे जबाबदार सरकार प्रस्थापित करण्याच्या मागणीसाठी होणाऱ्या देशी संस्थानातील लोकांच्या चळवळीकडेही लक्ष पुरविले. त्यांनी विद्यार्थी व युवक संघटनांशीही संबंध ठेवला होता. त्यांनी मार्क्सवादी कम्युनिझम आणि सामाजिक क्रांती या विषयांवर अनेक व्याख्याने दिली. त्यांनी समाज प्रबोधनाच्या आंदोलनाकडे कटाक्षाने लक्ष पुरविले कारण त्यांची ही खात्री होती की राजकीय आंदोलनाच्या यशस्वितेसाठी तर्कशुध्द शास्त्रीय दृष्टिकोन समाजाच्या अंगी रुजविणे आवश्यक आहे. रॉय हे त्या दिवसात तरी एकमेव राजकीय नेते होते की ज्यांनी तत्वज्ञानात्मक क्रांतीच्या आवश्यकतेवर भर दिला. त्या काळात त्यांनी खूपच राजकीय लेखन केले. त्यांची बरीच पुस्तकेही प्रसिध्द झाली. त्यातील नमुनेदार म्हणजे 'फॉसिझम,' 'हिस्टॉरिकल रोल ऑफ इस्लाम,' 'अवर प्रॉब्लेम्स' आणि 'लेटर्स टु द सी.एस.पी.' ही होत.

गेली कित्येक वर्षे युध्दाचे ढग क्षितिजावर तरंगत होते. रॉय यांच्यासह अनेकांनी त्यांचे निरीक्षण केले होते आणि लोकांना युध्दाच्या धोक्याचा इषारा दिला होता. 1939 सालच्या सप्टेंबर महिन्यात ते ढग आकस्मिकपणे कोसळले आणि युध्दाच्या आवर्तात जग सापडले. जे युध्द पेटले ते रॉय आणि अनेक लोकानी केलेल्या भाकितासारखे युध्द नव्हते. त्यांनी असे भाकित केले होते की हे साम्राज्यशाही युध्द होईल व नात्सी जर्मनीने सोव्हियट रशियाविरूध्द पुकारलेल्या या युध्दात नात्सी जर्मनीला इंग्लंड व फ्रान्सचे सहकार्य मिळेल. प्रत्यक्षपणे जे युध्द पेटले ते साम्राज्यवादी राष्ट्रांमध्येच उद्‌भवलेले युध्द होते आणि त्यात एका बाजूला नात्सी जर्मनी व फॅसिस्ट इटली उभे राहिले होते तर दुसऱ्या बाजूला इंग्लंड व फ्रान्स ही राष्ट्रे एकत्र आली होती. ते अनपेक्षित स्वरूपाचे युध्द होते आणि त्याचे सामाजिक स्वरूप व वैशिष्ट्य ठरविणे सोपे नव्हते.

देशातील डाव्या प्रवृत्तीच्या लोकांच्या 'त्यात सी.एस्.पी., कम्युनिस्ट पक्ष व फॉरवर्ड ब्लॉक यांचा समावेश होत होता' दृष्टीने हे युध्द साम्राज्यवादी युध्द होते. कारण साम्राज्यवादी इंग्लंड त्यात समाविष्ट झालेला होता. ब्रिटन-विरोधी

अशा त्यांच्या भावनांमुळे त्यांच्या मनात संशयही राहिला नाही. त्यांनी ठरविले की या युध्दाचा काही होवो तरी प्रतिकारच केला गेला पाहिजे; ही एक संधी भारताकडे चालून आली होती आणि भारताने आपले स्वातंत्र्य मिळविण्यासाठी त्या संधीवर झडप घातली पाहिजे. कम्युनिस्ट पक्षही 1941 च्या जूनमध्ये हिटलरने रशियावर हल्ला करीपर्यंत त्याच छावणीत होता. त्या सर्वांनी आग्रह धरला की काँग्रेसने तत्काळ युध्दविरोधी आंदोलन सुरू करावे.

गांधीजींची पहिली प्रतिक्रिया नात्सी जर्मनीविरूध्द पुकारलेल्या युध्दात इंग्लडला ·बिनशर्त पाठिंबा देण्याची होती. नेहरू जवळ जवळ त्याच मताचे होते. कारण ते निष्ठेने फॅसिस्टविरोधी होते आणि बरीच वर्षे ते इंग्लड आणि फ्रान्सला फॅसिस्ट-विरोधी युध्द सुरू करण्यासाठी आग्रह करीत होते. या उस्फूर्त प्रतिक्रिया कालांतराने बदलत गेल्या. गांधीजींच्या बाबतीत अहिंसेच्या विचाराने हा बदल घडला. नेहरूंनी राजकारणाच्या दडपणाखाली आपला विचार बदलला. नेहरूंना लोकांच्या ब्रिटिश विरोधी भावनांचा विचार करणे भाग होते. या भावना दोस्त सैन्याच्या प्रत्येक अपयशाबरोबर आणि लोकांचा पाठिंबा मिळविण्याच्या दृष्टीने कल्पकतेने वागण्याच्या बाबतीत भारत सरकारने केलेल्या प्रत्येक घोडचुकीबरोबर अधिकाअधिक उग्र होत गेल्या. काँग्रेसने आपल्या विरोधाची सुरूवात अधिकार पदांचे राजीनामे देऊन केली. व्हाइसरॉयने मध्यवर्ती असेंब्ली किंवा जनतेचे पुढारी यांची सल्लामसलत न घेता युध्दामध्ये भारताला ओढले याबद्दलचा निषेध व्यक्त करण्यासाठी हे राजीनामे देण्यात आले. त्यानंतर काँग्रेस सशर्त पाठिंबा देण्याकडे वळली. परंतु व्हाइसरॉय व ब्रिटिश सरकारने या अटी अंमलात आणावयाला नकार देऊन काँग्रेसला लढ्याच्या मार्गाकडे लोटले. त्याचे पर्यवसान अखेरीस 1942 च्या ऑगस्टमध्ये 'छोडो हिंदुस्थान' या आंदोलनामध्ये झाले. या आंदोलनाची परिणती ज्या वाकड्या तिकड्या मार्गाने झाली त्याचे येथे वर्णन करण्याची आवश्यकता नाही.

रॉय यांना काँग्रेसने स्वीकारलेली भूमिकाही आवडली नाही आणि युध्दाबद्दलचा काँग्रेसचा दृष्टिकोनही पसंत पडला नाही. त्यांनी आपली प्रतिक्रिया 6 सप्टेंबर 1939 मध्ये काढल्या एका निवेदनात प्रगट केली: "सर्व स्वातंत्र्य प्रेमी लोक ब्रिटनने घेतलेल्या निर्णयाबद्दल त्याचे अभिनंदन करतील. अर्थात् हिटलरवादाचा अंत करण्याचा हा निर्णय ब्रिटनने फार उशीराने घेतला आहे. वस्तुत: ब्रिटनने आतपर्यंत हिटलरवादाला उत्तेजनच दिले होते. हा निर्णय आधी घेतला गेला असता, तर युरोपमधील अनेक देशांचा बचाव झाला असता."[5] रॉय यांनी पुढील काही महिने युध्दाच्या बाबतीत विरोधी दृष्टिकोन ठेवला जाऊ नये याबद्दल काँग्रेसच्या नेत्यांची मने वळविण्यात घालविले. ऑल इंडिया काँग्रेसच्या अध्यक्षांना पत्र लिहिले आणि काँग्रेसने लढा पुकारण्याच्या दिशेने पाऊल

टाकू नये म्हणून आणखीही बरीच पावले उचलली. त्यात त्यांना यश आले नाही आणि कॉंग्रेसशी असलेले संबंध तुटण्यात त्याची परिणती झाली.

रॉय यांना आपल्या सहकाऱ्यांची मने वळविण्याचे कार्य करावे लागले. त्यासाठीही त्यांना पुष्कळ परिश्रम घ्यावे लागले. त्यांची समजूत घालण्यासाठी रॉय यांनी ऑक्टोबरमध्ये युध्दावरील एक प्रबंध तयार केला. त्यात त्यांनी स्पष्ट केले की हे साम्राज्यावादी युध्द नव्हे; हे असे एक राष्ट्राराष्ट्रातील युध्द आहे की ज्या बाबतीत साम्राज्यवादी युध्दाना विरोध करण्याच्या लेनिनवादी धोरणाची अंमलबजावणी करणे समर्थनीय ठरणार नाही. त्यांनी पुढे असे म्हटले की हे युध्द चालू राहिले तर हिटलरिझमचा पाडाव होण्यात त्याचा अंत होईल आणि म्हणून हिटलरविरूध्द लढणाऱ्या राष्ट्रात युध्दाचा प्रतिकार करण्याची आंदोलने सुरू करणे निखालस हानिकारक होईल. त्या सुमारास युध्दाने अशी चमत्कारिक अवस्था गाठली होती की ज्यातून एक प्रकारची कोंडी होणे शक्य होते. परंतु 1940 च्या एप्रिलच्या सुरूवातीला हिटलरने आपली विजयी घोडदौड सुरू केली आणि जूनच्या अखेरीपर्यंत जवळजवळ सर्व पश्चिम युरोप पादाक्रांत केला. त्यानंतर त्या देशातील सर्व खुल्या संस्था दडपून टाकण्यात आल्या. त्या राजवटींचे एकच उद्दिष्ट राहिले आणि ते म्हणजे युध्दासाठी सर्व साधनसामुग्री उपयोगात आणणे. इंग्लंड हा एकच देश या वरवंट्याखालून वाचला आणि सबंध जगातील स्वातंत्र्य व लोकसत्ता संपुष्टात आल्यासारखी दिसू लागली.

युध्दामधील या सर्व विनाशकारी घडामोडींचा रॉय यांच्यावर गाढ परिणाम झाला. त्यांना ही जाणीव झाली की युध्द हे आता जनतेचे फॅसिस्ट-विरूध्द युध्द झाले आहे आणि आता सर्व शक्ती युध्दातील यशासाठी पणाला लावण्याशिवाय गत्यंतर नाही. त्यांच्या मनाची सारी तगमग मे महिन्याच्या अखेरीस देहराडून येथे भरलेल्या अभ्यास मंडळाच्या बैठकीत त्यानी केलेल्या खालील निवेदनात प्रगट झाली आहे: ''दररोज सकाळी मी वृत्तपत्र हाती घेतो ते थरथरणाऱ्या हातांनी. साम्राज्यवादी फ्रान्स व ब्रिटनबद्दल मला प्रेम नाही. पण युरोप फॅसिझमच्या पंज्याखाली येण्याची कल्पना सुध्दा मला हृदयाचा थरकाप करणारी वाटते. जर्मनीत फ्रॅसिझमचा उदय झाल्यामुळे क्रांतीची एका पिढीपुरती तरी पीछेहाट झाली आहे. फॅसिझम जर संबंध युरोपवर आपले प्रभुत्व प्रस्थापित करू शकला तर क्रांतीचा कायमचा निरोप घेणेच बरे. भारताच्या स्वातंत्र्यालाही हा कायमचा निरोप देणे होईल.''[6]

त्यावेळी रॉय यानी कॉंग्रेसला अशी सूचना केली की 14 जुलै हा फ्रेंच राज्यक्रांतीचा दिवस आहे. फ्रान्स हा हिटलरने त्याच वेळी जिंकून घेतला असल्यामुळे या दिवशी फ्रान्सबद्दल सहानुभूती व्यक्त करण्यासाठी आणि

फ्रान्सशी आपली जवळीक प्रगट करण्यासाठी सबंध देशभर निदर्शने आयोजित करणे समयोचित होईल. ही सूचना अयोग्य म्हणून झिडकारण्यात आली. त्यानंतर ऑल इंडिया कॉंग्रेस समितीची बैठक पुणे येथे भरली. रॉय यांनी त्या बैठकीत फॅसिझमविरूध्दच्या लढाईत प्रत्यक्ष सहभाग घेण्याचे आवाहन करणारा ठराव मांडला. तो ठराव विचारातही घेतला गेला नाही.

लीग ऑफ रॅडिकल कॉंग्रेसमेन या रॉयवादी संघटनेने युध्दघोषणेच्या 1 सप्टेंबरला येणाऱ्या वाढदिवशी देशभर फॅसिस्ट-विरोधी निदर्शने संघटित करण्याचे ठरविले. कॉंग्रेसने त्या निदर्शनाना बंदी घातली. रॅडिकल्सनी तरीही जेव्हा निदर्शने केली. तेव्हा त्यांच्यावर शिस्तभंगाचे इलाज करण्यात आले. उत्तर प्रदेश कॉंग्रेस समितीने त्या कारणासाठी रॉय याना कॉंग्रेसमधून हाकलून लावले. काही दिवसानंतर तो ठराव मागे घेण्यात आला आणि रॉय यांना राजीनामा देण्याची परवानगी देण्यात आली. अशा रीतीने रॉय आणि रॅडिकल्स यांचे कॉंग्रेसशी असलेले नाते तुटले. रॉय यांचे कॉमिन्टर्नशी असलेले संबंध तुटल्यानंतर सुमारे अकरा वर्षांनी ही घटना घडली. दोन्ही प्रकरणी संबंध तुटले ते रॉय यांनी स्वत:च्या विचारांचे स्वातंत्र्य अबाधित ठेवण्याचा आणि आपल्या योग्य वाटेल त्या रस्त्याने वाटचाल करण्याचा आग्रह धरला म्हणून.

## टीपा

1. *ऑन स्टेपिंग आऊट ऑफ जेल.* मुंबईत प्रकाशित झालेली पुस्तिका.
2. *कित्ता* पृ. 4 ते 6.
3. अवर डिफरन्सेस पृ. 150.
4. *कित्ता.* पृ. 146 ते 152.
5. *रॉय, एम.एन. इंडिया अँड वॉर,* रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी. 1942, प्रस्तावना पृ. 1.
6. *कित्ता,* पृ. 129.

# युद्ध आणि क्रांती

काँग्रेसशी संबंध तुटल्यानंतर लीग ऑफ रॅडिकल काँग्रेसमेन या संघटनेचे रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षात रूपांतर करण्यात आले. उद्घाटनाची परिषद डिसेंबर 1940 मध्ये मुंबई येथे भरली होती. रॉय हे पक्षाचे मित्र, तत्वज्ञ आणि मार्गदर्शक होते. त्यांची कल्पना हा पक्ष जनता पक्ष म्हणून उभा करण्याची होती. फार काळ त्यांना असा जनता पक्ष म्हणून हवा होता. अनेक वर्षे त्यांनी आशा धरली होती की काँग्रेस तसा आकार घेईल आणि हे स्थित्यंतर घडवून आणण्यासाठी त्यांनी प्रयत्नही केले होते. ती आशा 1940 साली काँग्रेसने फॅसिस्ट-विरोधी युध्दाला पाठिंबा देण्याचे नाकारले तेव्हा मावळली. जनता पक्ष उभारण्याची आवश्यकता मात्र नाहीशी झाली नाही. रॅडिकल पक्ष ते कार्य करील अशी रॉय यांची अपेक्षा होती.

युध्काळातील व्यक्ती वा संघटना यांच्या पुरोगामीत्वाची रॉय यांची एकच कसोटी होती आणि ती म्हणजे युध्दाबद्दलचा दृष्टिकोन ही होय. युध्द ही त्या काळातील सर्वोच्च महत्वाची घटना होती. साऱ्या जगाचे दैव त्यावर अवलंबून होते. जो कोणी युध्दाला पाठिंबा देईल आणि त्याच्या यशासाठी झटेल तो पुरोगामी आणि बाकीचे प्रतिगामी आणि प्रगतीचे शत्रू होत. त्या कसोटीवर ब्रिटीश युध्दप्रयत्नांचा नेता आणि संघटक झालेला विन्स्टन चर्चिल हा पुरोगामी आणि क्रांतिकारक होता; तर गांधीजी, नेहरू आणि काँग्रेस दुसऱ्या गटात मोडत होते. रॉय यांना म्हणूनच ब्रिटिशांना मदत करणे व त्यांच्या खांद्याला खांदा लावून उभे राहणे यात कोठलाही संकोच वा खेद वाटला नाही आणि काँग्रेस व तिचे नेते यांच्यावर टीकेची झोड उठविणे व त्यांच्या चुका दाखवून देणे हे आपले कर्तव्य वाटले. या दृष्टिकोनामुळे रॉय हे लोकांमध्ये अत्यंत अप्रिय झाले आणि अनेक शिव्याशापांचे व खुनशी हल्ल्यांचे ते लक्ष्य बनले. तथापि त्यामुळे त्यांचे धैर्य खचले नाही; त्यांच्यावर शिव्यांचा जो वर्षाव होत राहिला त्याची क्षिती न बाळगता ते आपल्या कर्तव्याच्या मार्गावर अढळ राहिले.

युध्दाच्या सुरूवातीच्या काळातील रॉय यांच्या लेखनातील खालील दोन उताऱ्यांवरून त्यांच्या भावनांची तीव्रता प्रतीत होईल. एका प्रसंगी त्यांनी लिहिले:''आम्हाला फॅसिझमचा पराभव हवा आहे कारण आम्ही क्रांतिकारक आहोत; आणि आम्हाला हे माहीत आहे की फॅसिझमच्या पराभवामुळे साम्राज्यशाही

दुबळी होईल. नाहीतर अशी परिस्थिती निर्माण होईल की उभ्या जगातील क्रांतिकारक शक्तींचे निमूर्लन होईल आणि भारतीय स्वांतत्र्याचे उद्दिष्टही असाध्य होईल म्हणून आम्हाला फॅसिझम विजयी व्हावयाला नको आहे. आपल्याला खरोखरच फॅसिझमचा नाश हवा असेल तर हा नाश घडून यावा म्हणून आपण जे जे काही करता येईल ते करावयाला सिध्द का होऊ नये?''[1]

दुसऱ्या एका प्रसंगी त्यांनी लिहिले:''स्वातंत्र्य व लोकसत्ता यांच्यासाठी लढणाऱ्या लोकांचे, फॅसिझमविरूध्द लढाई करणे हे एकमेव उद्दिष्ट असले पाहिजे. ज्या धोरणात या उद्दिष्टावर लक्ष केंद्रित केलेले नसेल ते धोरण निखालस चुकीचे होय. फॅसिझम हे सबंध जगात जी पध्दती सडून गेली आहे तिला आधार देण्यासाठी निर्माण केलेले साधन आहे. फॅसिझमचा नाश झाला तर ही पध्दतीच कोसळून पडेल. त्यानंतर स्वतंत्र भारत, एका उच्च प्रकारच्या संस्कृतीची उभारणी करणाऱ्या विमुक्त लोकांच्या जगात आपली हक्काची जागा घेईल. म्हणून भारताने, साम्राज्यशाही ब्रिटनचे आपल्याबाबतचे कोणतेही धोरण असले तरी या युध्दात भाग घेतला पाहिजे. भारतीय स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या लोकशाहीसाठी, आपल्या स्वतःच्या हितासाठी लढत आहो असे समजून या युध्दात सहकार्य दिले पाहिजे.''[2]

रॉय यानी युध्दाला दिलेला पाठिंबा काही अंशी तरी युरोपमधील स्वातंत्र्य व लोकसत्ता आणि युरोपीय संस्कृतीचे भवितव्य याबद्दलच्या चिंतेचा आविष्कार होता. नेहरू वगळले तर दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रीय नेत्याला अशी चिंता वाटली नाही. नेहरूंना म्हणूनच राष्ट्रवादी आंदोलन जे वळण घेत होते त्याबद्दल दुःख वाटले. पण त्यापासून ते अलग होऊ शकले नाहीत. रॉय हे आपल्या मार्गाने जावयाला अधिक स्वतंत्र होते. फॅसिझमच्या यशामुळे युरोप रानटीपणाकडे झुकण्याची शक्यता निर्माण झाली आहे याचेच रॉय यांना मनस्वी दुःख होत होते. ते काळेकुट्ट दिवस होते खरे, जेव्हा युरोप हिटलरच्या पायाशी लोळण घेत पडला होता. त्या दिवसात युरोपची असहाय्य स्थिती वर्णन करण्यासाठी व त्यातून बाहेर पडण्याचा रस्ता दाखविण्यासाठी रॉय यानी जे हृदयद्रावक लेख लिहिले ते पुढे 'व्हिदर युरोप?' या पुस्तकात एकत्र करण्यात आले. त्यानंतर काही दिवसांनी थोड्याशा सुधारणा करून 'रशियन रेव्होल्यूशन' या त्यांच्या मोठ्या पुस्तकात समाविष्ट करण्यात आले.

त्याचवेळी रॉय यांनी भारतीय स्वातंत्र्याच्या प्रश्नाकडे डोळेझाक केली नाही. त्यांचा असा दावा होता की भारत हा स्वतंत्र जगातच स्वतंत्र होऊ शकेल. फॅसिझम यशस्वी झाला तर भारत स्वतंत्र होऊ शकणार नाही; त्याचे मालक तेवढे बदलतील. ब्रिटिश मालकांच्या ऐवजी जर्मन वा जपानी मालक त्यांची जागा घेतील. त्याच्याउलट फॅसिझमविरूध्द यशस्वी लढाई

देण्यात आली तर साम्राज्यशाही इतकी दुबळी होईल आणि त्यातून अशा सामाजिक शक्ती उफाळून बाहेर पडतील की ब्रिटनला भारताला गुलामगिरीत ठेवताच येणार नाही.

त्यांनी त्यावेळी लिहिले: ''फॅसिझमला यश मिळाले तर सारे जग उध्वस्त होईल आणि जगाबरोबर भारतही रानटी अवस्थेत बुडून जाईल म्हणून जगाच्या स्वातंत्र्यासाठीच नव्हे, फॅसिझमच्या जुलुमाखाली भरडल्या जाणाऱ्या परदेशातील लोकांच्या विमुक्तीसाठीच नव्हे तर आपल्या स्वातंत्र्य लढ्याच्या अंतिम यशासाठी सुध्दा तमाम स्वातंत्र्याचा अपहार करणाऱ्या या सर्वात भयानक शत्रूचा नाश घडवून आणलाच पाहिजे.'' त्या दृष्टीने त्यांनी पुढे युक्तिवाद केला की फॅसिझम विरूध्द युध्द हे म्हणूनच भारतीय स्वातंत्र्यासाठी होणारे युध्द आहे आणि सर्व भारतीयानी त्याला सहाय्य देणे हे श्रेयस्कर आहे.''[3] रॉय यानी जे भाकित केले होते ते पुढे खरे ठरले. पण राष्ट्रवाद्यांनी त्यावेळी त्यावर विश्वास ठेवला नाही.

त्यावेळी देशातील भावना ही मुख्यत: ब्रिटिशविरोधी आणि म्हणून फॅसिझमला पोषक होती. त्या भावनेला सी.एस.पी. कम्युनिस्ट पक्ष, फॉरवर्ड ब्लॉक आणि इतर डाव्या गटाचे लोक त्याचप्रमाणे काँग्रेसमधील लढाऊ राष्ट्रवादी यानी खतपाणी घातले. त्या भावना, युध्दाच्या सुरूवातीच्या वर्षात ब्रिटनला लागोपाठ जी माघार घ्यावी लागली त्यामुळे आणि काँग्रेसने केलेल्या मागण्या मान्य न करण्यात काँग्रेसने जो आडमुठेपणा दाखविला त्यामुळेही अधिकच धारदार झाल्या. भारत सरकार काँग्रेस बद्दलच साशंक नव्हते तर युध्दाला बिनशर्त पाठिंबा देऊ केलेल्या रॅडिकल्सबद्दलही तितकेच साशंक होते. याबद्दल रॉय यांनी एकदा म्हटले: ''आम्ही जणू काही सैतान आणि अथांग सागर यांच्या दरम्यानच आज उभे आहो. संकुचित वृत्तीचे राष्ट्रवादी आमच्याविरूध्द टीकेचा भडिमार करीत आहेत. कारण त्यांना प्रश्न किती गंभीर प्रश्न उभे राहिलेले आहेत त्यांचे आकलन करता येत नाही किंवा जी मूल्ये आज धोक्यात आली आहेत त्यांचेही मूल्यमापन करता येत नाही. त्याच्याउलट सरकार साशंक आहे. कारण आम्ही शपथबध्द क्रांतिकारक आहोत. पण निष्ठेतून येणारे धैर्य आणि आपल्यापुढील ध्येयाचे स्वच्छ दिग्दर्शन यांच्या आधारे आपण या भीषण संकटाचा सामना करू यात संशय नाही.''[4] त्या दिवसात वेळोवेळी अशा वावड्या उडत की रॉय यांचा व्हाइसरॉयच्या कार्यकारीमंडळात समावेश केला जाणार आहे. त्या वावड्या खोट्या ठरल्या. पण आपल्या व्यक्तित्वाच्या जोरावर आणि अविरत कार्याच्या आधारे रॉय यांनी सरकारमधील काही मोक्याच्या जागीच्या अधिकाऱ्यांचा विश्वास मात्र संपादन केला. त्यामुळे रॉय याना आपले कार्य अधिक सुरक्षितपणाने व नेटाने करता आले.

1941 च्या जूनमध्ये जर्मनीने रशियावर हल्ला केला. रॉय यांनी जे भाकित केले होते की फॅसिस्ट-विरोधी युध्द रशियापर्यंत पसरेल आणि रशिया या युध्दात लोकशाहीच्या बाजूने ओढला जाईल ते खरे ठरले. त्या घटनेमुळेही युध्दाबद्दलच्या काँग्रेसच्या भूमिकेत बदल झाला नाही. 1942 च्या सुरूवातीला युध्द भारतापर्यंत पोचले. जपानने आता युध्दात भाग घेतला होता आणि काही महिन्यांच्या आतच त्याने आग्नेय आशियातील बलाढ्य ब्रिटिश साम्राज्याच्या नाड्या आखडून टाकल्या होत्या. त्यानंतर मद्रास व कलकत्ता येथे बाँब टाकण्यात आले आणि सबंध देशभर भीतीची लहर उसळली. भारत सरकारपाशी देशाच्या संरक्षणाच्या योग्य योजना नव्हत्या व त्यासाठी आवश्यक असलेली व्यवस्थाही नव्हती. या आणीबाणीच्या वेळी काँग्रेस व मुस्लिम लीगचा अनुनय करण्यासाठी क्रिप्स यांच्या नेतृत्वाखाली एक शिष्टमंडळ आले. त्या शिष्टमंडळाला अपयश आले. काँग्रेसने आपली असहकारिता चालूच ठेवली आणि अखेरीस 1942 च्या ऑगस्टमध्ये प्रतिकाराचे आंदोलन सुरू केले. या घडामोडीबद्दल रॉय यांना फार दु:ख झाले. त्यांनी देशाच्या संरक्षणावर हा आघात मानला. त्याचप्रमाणे फॅसिस्ट-विरोधी शक्तींचा हा विश्वासघात होय अशीही या प्रतिकाराची चिकित्सा के[illegible] [illegible]न-छोडो आंदोलनाविरूध्द छातीठोकपणे उभे राहिले. रॉय आणि [illegible] [illegible] या आंदोलनाला विशेष विरोध करण्याबद्दल फार मोठी किंमत द्यावी लागली. कारण अनेक लोकांच्या मते हे आंदोलन ही ब्रिटिश साम्राज्यवादी विरूध्द पुकारलेली अंतिम लढाई होती. रॉय व रॅडिकल्सवर टीकेचा वर्षाव झाला, त्यांचा हरप्रकारे छळ करण्यात आला. काही ठिकाणी तर त्यांच्यावर दगडांचा मारा झाला आणि व्यक्तिगत हल्लेही झाले.

रॉय यानी ठामपणे जाहीर केले की देशाचे संरक्षण हे देशातील जनतेचे कर्तव्य तशीच जबाबदारी आहे. परकीय सरकार पराभवांती देशाच्या भवितव्याची पर्वा न करता देश सोडूनही जाईल पण लोक आणि त्यांचे पुढारी याना ही बेपर्वाईची वृत्ती ठेवून चालणार नाही. देशात भीतीचे वातावरण पसरले असताना रॉय कलकत्त्यात होते. त्यांनी अनेक सभात भाषणे केली आणि गनिमी लढाईबद्दल व संरक्षण समित्यांबद्दलही ते लोकांशी बोलले. त्या भाषणांमुळे थोडेसे वातावरण स्थिर झाले. या सुमारास औद्योगिक कामगारांपैकी अनेक लोक बाँबहल्ले व शत्रूचे इतर हल्ले यांबद्दलच्या दहशतीने कारखाने सोडून पळून जाऊ लागले होते. त्यांना कामावर ठेवणे आवश्यक होते. ते यासाठी की उत्पादन अभंग रहावयास पाहिजे. त्यासाठी प्रचार जसा आवश्यक होता त्याचप्रमाणे इतर आश्वासक उपाययोजनाही अंमलात आणण्याची आवश्यकता होती. या कामासाठी सरकारने आर्थिक मदत देऊ केली. ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसला त्याचप्रमाणे रॉय यांच्या नेतृत्वाखाली युध्दाला आणि

युध्दप्रयत्नांना संपूर्ण पाठिंबा देण्याच्या हेतूने सुरू करण्यात आलेली नवी कामगार संघटना, इंडियन फेडरेशन ऑफ लेबरलाही ही मदत देऊ करण्यात आली. रॉय यानी फेडरेशनतर्फे या आर्थिक मदतीचा स्वीकार केला. ती दरमहा 13,000 रूपयांची होती. ती सुमारे दोन वर्षेपर्यंत चालू राहिली. ती सबंध रक्कम प्रचारासाठी आणि भीतीचे वातावरण पसरू नये म्हणून कामगारांच्या समित्या स्थापन करण्यासाठी खर्च करण्यात आली. त्यासाठी होणाऱ्या खर्चाचे विस्तृत हिशेब अकाउंटंट जनरलचे समाधान होऊ शकेल याप्रमाणे सादर करण्यात आले. तथापि ही मदत स्वीकारल्यामुळे रॉय यांचे टीकाकार हितशत्रू यांना त्यांच्याविरूध्द प्रचार करण्यासाठी आणखी एक सबब तेवढी मिळाली. त्यांच्याविरूध्द आणि त्यांच्या सहकाऱ्यांविरूध्द विषारी प्रचार मोहीमच सुरू करण्यात आली.

हा दुष्ट प्रचार आणि ही अन्याय्य टीका ही रॉय यांच्या खिजगणतीतही नव्हती. युध्दासाठी झटणे आणि युध्दप्रयत्नांना सहाय्य देणे हे त्यांच्या दृष्टीने समाजक्रांतीसाठी कार्य करण्यासारखेच होते की ज्याच्यासाठी त्यांनी आपले जीवन व्यतीत केले होते. युध्दात समाविष्ट झालेल्या सर्व देशात सामाजिक क्रांती घडून येत होती. वरिष्ठ वर्ग उध्वस्त केले जात होते आणि शोषित कामगार वर्ग महत्वाच्या जागांवर प्रस्थापित होत होता. त्यांनी ग्रेट ब्रिटनमध्ये स्वतःच्या डोळ्यासमोर हे होत असलेले पाहिले होते. त्यांची ही अपेक्षा होती की भारतातील लोकांनी युध्दप्रयत्नांशी जाणीवपूर्वक, हेतुपूर्वक सहकार्य केले तर भारतातही तसेच घडून येईल. त्यांचे असे मत होते की काँग्रेसने युध्दप्रयत्न विकसित करण्याची जबाबदारी स्वीकारली तर परिस्थितीतील चैतन्यामुळे काँग्रेस ज्या सत्तेची मागणी करीत होते ती काँग्रेसच्या हाती येईल. त्यांच्या दृष्टीने हे युध्द आंतरराष्ट्रीय यादवी युध्द होते. त्यांना ही खात्री होती की फॅसिस्ट प्रवृत्तीच्या लोकांचाही पराभव घडून येईल. याच आत्मविश्वासपूर्ण निष्ठेने क्रांतिकारक शक्तींनी युध्दकाळात ब्रिटिश साम्राज्यशाहीशी सहकार्य केले की ज्या सहकार्यामुळे रॉय यानी भाकित केल्याप्रमाणे ब्रिटिश साम्राज्यशाही, सुसंस्कृत व जागरूक ब्रिटिश लोकसत्तेच्या हाती सत्ता देऊन लवकरच काढता पाय घेणार होती. भारतीय स्वातंत्र्य काही वर्षांनी पुढे ढकलले गेले कारण भारताने त्यांचा सल्ला स्वीकारला नाही. परंतु 1947 साली जेव्हा ते स्वातत्र्य आले ते शांततेने तसेच राज्यघटनात्मक मार्गाने आले. त्याचे मुख्य कारण असे आहे की युध्दाने साम्राज्यशाहीच्या जागी लोकशाही प्रस्थापित केली होती. रॉय यानी आधीच भविष्यवाणी उच्चारली होती की फॅसिस्ट राजवटीच्या पराभवानंतर साम्राज्यशाही सुकून जाईल. ब्रिटिश, फ्रेंच आणि उच साम्राज्यशाह्यांचे दक्षिण व आग्नेय आशियातील देशातून युध्दाच्या

अखेरीस जे उच्चाटन झाले, ते रॉय यांच्या या भविष्यवाणीचे प्रसादचिन्हच मानावे लागेल. आपल्या भाकितांचा इतका चांगला पुरावा कोणत्याही राजकीय शास्त्रज्ञाने आपल्या गाठी बांधला नसेल.

1942 च्या अखेरीस हे स्पष्ट झाले की युध्दाचा फॅसिस्ट राजवटींच्या पराभवात अंत होईल. ते स्पष्ट झाल्यानंतर रॉय यानी भारतातील युध्दोत्तर घडामोडींबद्दल विचार सुरू केला. भारत स्वतंत्र होईल याबद्दल त्यांच्या मनात संदेह नव्हता. त्यांना स्वतंत्र भारताच्या आर्थिक योजना तयार करावयाला पाहिजे याबद्दल आपल्या कल्पना दिग्दर्शित केल्या. त्या कल्पनांच्या पायावर त्यांचे तीन सहकारी जी. डी. पारिख, व्ही. एम्. तारकुंडे आणि बी. एन्. बॅनर्जी यानी 1944 साली 15,000 कोटी रुपयांची एक दशवर्षीय योजना तयार केली. ही योजना जनता योजना (पीपल्स प्लॅन) म्हणून ओळखली जाऊ लागली. त्याच सुमारास उद्योगपतींच्या एका गटाने 'मुंबई योजना' या नावाची जी एक योजना तयार केली होती तिच्याशी वैशिष्ट्यपूर्ण असा फरक दिसून यावा म्हणून रॉय यांच्या सहकाऱ्यांनी तयार केलेल्या योजनेला 'पीपल्स प्लॅन' असे नाव देण्यात आले. ही योजना सर्वस्वी रॉय यांची योजना होती आणि तिचे मूलभूत वैशिष्ट्य म्हणजे शेती व समाजकल्याण यावर तीत दिलेला भर आणि योजनेतच त्याच्यासाठी लागणाऱ्या भांडवलाची व्यवस्था करण्याचा रॉय यानी टाकलेला पवित्रा हे होय. देशात 1951 साली नियोजनाचे युग सुरू झाले त्यावेळी सरकार व योजनाकार यानी 'जनता योजने'कडे लक्ष दिले नाही ही एक खेदजनक घटना होय.

त्यानंतर एक वर्षाने रॉय यांनी देशाच्या राजकीय व्यवस्थेबद्दलची एक रूपरेषा तयार केली. आर्थिक पुनर्रचनेप्रमाणेच राजकीय पुनर्रचनाही आवश्यक होती. जनता योजनेचा पायाच वस्तुत: तो होता म्हणून जनता योजनेनंतर काही महिन्यांच्या आत स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेचा एक आराखडाही तयार करण्यात आला. 'ड्राफ्ट कॉन्स्टिट्यूशन' म्हणून तो ओळखला जाऊ लागला. रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षाने उद्‌घाटनाच्या अधिवेशनात जी अठरा तत्वे मंजूर केली होती व तेव्हापासून ती लोकांमध्ये रूढ करण्याचा प्रयत्न केला होता, त्यांच्या पायावर हा घटनेचा आराखडा बनविण्यात आला होता. तो आराखडा रॉय यांनी तयार केला आणि 1944 च्या डिसेंबर महिन्यात तो लोकांपुढे चर्चेसाठी ठेवला.

घटनेच्या या मसुद्यात फक्त मूलभूत प्रश्न आणि वादग्रस्त समस्यांचाच विचार करण्यात आला असून 'आराखडा' मंजूर केल्यानंतरच बाकीचा तपशील भरण्यात यावयाचा होता. लोकशाहीवादी राजवटीचेच चित्र त्यात रंगविण्यात आलेले आहे. काही निश्चित मूलभूत सामाजिक व राजकीय तत्वांच्या पायावर

तिची रचना करण्यात आली आहे. ''सरंजामदारीचे अवशेष असलेल्या देशी संस्थानांचा लोप करून, भाषिक व सांस्कृतिक एकसूत्रीपणाच्या तत्वावर त्यांचा शेजारच्या प्रांतात समावेश केला जाईल.'' असे घटनेत आश्वासन देण्यात आलेले आहे. त्याहिपेक्षा महत्वाचे असे नवे घटनेचे वैशिष्ट्य खालीलप्रमाणे दिग्दर्शित करण्यात आलेले होते: ''संघटित लोकशाही ही राज्यघटनात्मक सत्तेचा स्त्रोत मानला जाईल. लोकांच्या सार्वभौम अधिकाराच्या अंमलबजावणीचे तेच खरे साधन होईल. इतिहासाचा अनुभव असा आहे की व्यक्तिगत मतदार लोकशाहीला आशय देऊ शकत नाहीत'' संघटित लोकशाही ही एका प्रचंड देशात निवडणुकी घेण्यातील सान्या अडचणी दूर करू शकेल. ही लोकशाही कायदेकानू करणारे मंडळ आणि त्यांची अंमलबजावणी करणारी नोकरशाही यांच्या कार्यात एकसूत्रीपणा आणू शकेल. या दोन यंत्रणात फारकत केली गेल्यामुळे लोकशाहीच्या व्यवहारात अडथळे आले असून लोकांचे सार्वभौमत्व हा फक्त एक उपचार झाला आहे'' या आणि इतर नावीन्यपूर्ण वैशिष्ट्यांना आधार देताना हा मसुदा म्हणतो; ''जगामध्ये आता असे वाढते लोकमत प्रगट होऊ लागले आहे की युध्दपूर्व जगाचे आता पुनरूज्जीवन होऊ शकणार नाही. त्या जगाची राजकीय तशीच आर्थिक दृष्टीने पुनर्रचना झाली पाहिजे. आणि ही पुनर्रचना खरोखरीच व्हावयाची असेल तर राजकीय हक्क आणि आर्थिक सत्ता यात काही सबंध प्रस्थापित केले गेले पाहिजेत. या संबंधाच्या आधारावरच खरोखरीची लोकशाहीवादी राज्यघटना कार्यक्षम होऊ शकेल.'' अखेरीस या मसुद्यात ठामपणे जाहीर करण्यात आले आहे: ''युध्दाच्या या रसायन प्रक्रियेतून एक नवे जग उदयास येईल. भारत हा त्या जगाचा एक घटक राहील. हा मसुदा त्या नव्या भारताचे चित्र रेखाटीत आहे.''[5]

युध्दाच्या उरलेल्या काळात, जनता योजना आणि घटनेचा मसुदा याबद्दल बराच प्रचार करण्यात आला. या दोन्ही मसुद्यात रॉय यांच्या जीवनाची नवी प्रेरक शक्ती होणाऱ्या जहाल मानवतावादाची वैशिष्ट्ये प्रतिबिंबित झाली आहेत. जीवनाच्या अखेरच्या कालखंडातील रॉय यांचे सारे कार्य या प्रेरणेतूनच विकसित होत गेले.

## टीपा

1. *इंडिया अँड वॉर*, पृ. 134.
2. *कित्ता*, प्रस्तावना, पृ. 30 ते 32.
3. *कित्ता*, पृ. 240.
4. *कित्ता*, पृ. 332.
5. *कॉन्स्टिट्यूशन ऑफ इंडिया - अ ड्राफ्ट, प्रस्तावना.*

# जहाल मानवतावादाकडे

जीवनाच्या पुढील व अखेरच्या अवस्थेत रॉय कम्युनिझम पासून दूर गेले आणि त्यांनी जहाल मानवतावादाकडील आपला प्रवास सुरू केला. कम्युनिझमचे दोष आणि उणीवा यांचा शोध घेतल्यानंतर जहाल मानवतावाद हे नवे, सर्व व्यापी जीवनाचे तत्वज्ञान रॉय यांनी विकसित केले.

युध्दकाळात आणि त्यानंतर लगेच जे काही घडले त्यांचा रॉय यांच्या सदैव शोधक मनावर फार मोठा आघात करणारा परिणाम झाला. त्यातून अनेक कम्युनिस्ट तत्वे व प्रमेये यांचा फेरविचार करण्याची रॉय यांच्यामध्ये उर्मी आली. त्यांनी कम्युनिझम हे स्वातंत्र्याचे तत्वज्ञान म्हणून स्वीकारले होते. परंतु प्रत्यक्षात त्यांना आढळून आले की रशियामध्ये जेथे कम्युनिझम यशस्वी झाला होता तेथे त्याने जुलूम जबरदस्तीची आणि गुलामगिरीची राजवट प्रस्थापित केली होती. युध्दाच्या अखेरीस जेव्हा त्यांनी पाहिले की स्तालिन हे पुरोगामी शक्तींचे नैतिक नेतृत्व जे त्यांच्या हाती होते ते झुगारून देऊन युरोपवर लष्करी दृष्टीने प्रभुत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहेत. तेव्हा त्यांना धक्का बसला आणि दुःखही झाले. रॉय यांना जी नवी माहिती उपलब्ध झाली त्याच्या आधारे त्यांना हेही कळून चुकले की स्तालिन यांच्या नेतृत्वाखाली युध्दकाळात रशियाने जी धोरणे आणि डावपेच उपयोगात आणले आणि ज्यांना त्यांनी स्वतःही पाठिंबा दिला होता, तेही तितकेच आक्षेपार्ह, संकुचित आणि संधिसाधूपणाचे होते. रॉय यांना आता परिपूर्ण जाणीव झाली की रशियाची राष्ट्रवादी राजवटीतच अवनती झाली आहे. या सर्व चुका आणि दुष्कृती यांचा दोष कोणा एका व्यक्तीवर न लादता रॉय हे स्तालिन व इतर कम्युनिस्ट नेते यांच्या कृतीना ज्या मूलभूत तत्वज्ञानातून मार्गदर्शन मिळाले होते त्या तत्वज्ञानाचा मूलतः विचार करण्याकडे वळले.

त्यांना त्यावेळी हे कळून आले की कम्युनिझममध्ये मानवाबद्दल संपूर्ण बेफिकीरी, इतकेच नव्हे तर तिरस्कार प्रगट होत आहे. त्यांना दिसून आले की कम्युनिझममध्ये माणूस हा आंधळ्या आर्थिक शक्तींच्या हातातील एक बाहुले बनत असून एका वर्गाच्या व्यापक समुच्चयात तो एक वैशिष्ट्यहीन घटक तेवढा झाला आहे. स्वातंत्र्य तसेच सार्वभौमत्व त्याच्यापासून हिरावून घेतले गेले आहे. तीच गोष्ट भांडवलशाहीमध्येही होत होती आणि रॉय यांच्या

दृष्टीने तेच तर जगाला ग्रासून टाकणाऱ्या अरिष्टाचे मूलभूत कारण होते. त्या अरिष्टातून बाहेर पडण्याचा मार्ग भांडवलशाहीही दाखवू शकत नाही आणि कम्युनिझमही दाखवू शकत नाही.

रॉय यांनी युरोपमधील दीर्घ अनुभवांती पार्लमेंटरी पध्दतीचे राजकीय क्षेत्रातील आणि खुल्या बाजारपेठेचे आर्थिक क्षेत्रातील दोष पाहिले होते. त्यावर ज्या उपायांचा कम्युनिझमने पुरस्कार केला होता, ते म्हणजे कामगार वर्गाची अधिसत्ता आणि केंद्रीय नियोजन. हेही तितकेच दोषास्पद होते. कम्युनिझमने माणसाला विमुक्त करण्याऐवजी त्याला पक्षनेत्याच्या हुकुमशाहीखाली असलेल्या पक्षाने निर्माण केलेल्या अतिप्रबळ राजवटीचा गुलाम तेवढे केले. म्हणूनच कम्युनिझमपलीकडे जाऊन माणूस म्हणून माणसाला स्वातंत्र्य आणि प्रगतीची हमी देणाऱ्या राजकीय व आर्थिक संघटनांचा विचार करणे अत्यंत आवश्यक होते. माणूस हा माणूस म्हणून विचारात घेतला जावा. देशाच्या या वर्गाचा प्रतिनिधी म्हणून नव्हे हे या संदर्भात लक्षात ठेवणेही आवश्यक आहे. रॉय यांच्या डोळ्यासमोर उभी राहिली ती संघटित लोकशाही आणि सहकारी अर्थव्यवस्था. मग त्यांनी असे प्रतिपादन केले की जगाला ग्रासलेल्या अरिष्टातून बाहेर पडण्याचा तोच एक मार्ग आहे. तो मार्ग स्वीकारण्यात आला नाही तर युध्द व विनाश यांच्याकडे जग ओढले जाईल असाही त्यांनी इषारा दिला.

तथापि संघटित लोकशाही आणि सहकारी अर्थव्यवस्था या दोघांनाही तत्वज्ञानात्मक आधार देणे आवश्यक होते. रॉय यांनी आपल्या नव-विकसित जहाल मानवतावादाच्या तत्वज्ञानामार्फत हा आधार दिला. 1944 पासूनच ते हे तत्वज्ञान विकसित करू पाहात होते. 1946 साली त्यांनी बावीस तात्विक मुद्दयांचे विवरण केले. निश्चित अर्थवाही निवेदनांच्या स्वरूपात ते ग्रथित करण्यात आले आहेत. रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षाने अनेक महिने या प्रबंधावर चर्चा केली आणि कालांतराने 1946 साली मुंबई येथे भरलेल्या परिषदेत त्यांचा स्वीकार केला. 1947 साली एका जाहीरनाम्याच्या स्वरूपात त्यांचा विस्तार करण्यात आला. या जाहीरनाम्याला 'न्यू ह्यूमॅनिझम' हे नाव देण्यात आले. काही कालावधीनंतर हा जाहीरनामा कार्ल मार्क्सने 1948 साली प्रकाशित केलेल्या कम्युनिस्ट मॅनिफेस्टो सारखी क्रांतिकारक साहित्यात प्रतिष्ठा मिळविण्याची शक्यता आहे.

जहाल मानवतावादात स्वातंत्र्य हेच मूलभूत मूल्य आहे. ते सर्वश्रेष्ठ मूल्य आहे, ज्यातून सर्व मानवी मूल्यांचा उगम होतो. रॉय यांनी आपल्या स्वातंत्र्याची कल्पना खालील शब्दात मांडली ''जीवनाचे कार्य जगणे हे आहे. जीवनाची मूलभूत प्रेरणा ही जगण्यासाठी केला जाणारा संघर्ष होय. तो संघर्ष जीवाच्या उत्क्रांतीतील दीर्घ प्रक्रियेत सतत चालू असतो. अखेरीस

माणसाच्या बाबतीत स्वातंत्र्यासाठी जाणीवपूर्वक आग्रह धरण्यात तो परिणत होतो. सर्वश्रेष्ठ मानवी मूल्य ते हे होय. स्वातंत्र्यासाठी माणसाचा जो अमर्याद संघर्ष चालू असतो. त्यांची सुरूवात प्राणीमात्राच्या अस्तित्वासाठी चालू असलेल्या संघर्षातूनच होत असते. माणसाने जे काही केले आहे, त्याची प्रत्येक कृती, त्यांची सांस्कृतिक प्रगती, वैज्ञानिक कर्तृत्व, कलात्मक अविष्कार या सर्व गोष्टी त्या प्रेरणेतूनच घडून येत असतात. माणूस हा मर्यादित आहे. विश्व हे मात्र अमर्याद आहे आणि त्याच्या भोवतीचा अवकाश हे तर अवघे विश्व आहे. साहजिकच माणसाचा संघर्ष हा चिरंतन आहे. त्याला हे विश्व कधीच जिंकता येणार नाही. म्हणून स्वातंत्र्याची प्रेरणा ही मानवी विश्वातील एकमेव चिरंतन गोष्ट होय. या प्रेरणेतून माणसाला ज्ञान प्राप्त होते. आपल्या भोवतीचा अवकाश तो ज्ञानाच्या मार्गे जिंकतो.''[1]

जहाल मानवतावाद हे जीवनाचे तत्वज्ञान म्हणून मानवी अस्तित्वाचे संपूर्ण क्षेत्र व्यापून टाकते. त्यात अमूर्त विचारापासून सामाजिक आणि राजकीय पुनर्रचने पर्यंतच्या सर्व विषयांचा समावेश होतो. ते तत्वज्ञान आधिदैवततेवर विश्वास ठेवीत नाही. त्या तत्वज्ञानाप्रमाणे माणूस ही निसर्गाची उत्पत्ती आहे. भौतिक विश्वाचा तो एक महत्वाचा घटक आहे. विश्व ही व्यवस्थाबध्द पध्दती आहे ''म्हणून माणसाचे अस्तित्व आणि त्याचे व्यापार, त्याच्या भावना, त्यांची इच्छाशक्ती आणि कल्पना या सुध्दा पूर्वनियोजित असतात. माणूस हा त्यामुळेच मुख्यतः तर्कबध्द असतो. माणसाच्या मनातील विवेक हा विश्वाच्या एकात्मतेचाच प्रतिध्वनी असतो.''[2] माणूस हा नैतिक असतो, कारण तो तर्कबध्द असतो. तर्कशुध्दता वाढते तसतशी नैतिकता वाढते. म्हणून रानटी अवस्थेतील माणूस सुसंस्कृत नागरिक कसा बनला हे पाहण्यासाठी एखाद्या परकीय वा आधिदैविक शक्तीकडे जाण्याची मुळीच आवश्यकता नाही. माणसाने समाज निर्माण केला, तो आपल्या अस्तित्वासाठी करावा लागणारा संघर्ष यशस्वी रीतीने चालविण्यासाठी. रॉय यांच्या मते, ''मानवी प्रगतीसाठी होणारा सामाजिक संघर्ष, मानवी उत्क्रांतीची समूळ प्रक्रिया ही दुसरी तिसरी काही नसून अस्तित्वासाठी कराव्या लागणाऱ्या संघर्षाला उच्च पातळीवर नेण्याचाच तो एक चालू असलेला प्रयोग आहे. उच्च पातळीवरील या संघर्षाचे मार्गदर्शन आता उस्फूर्त संवेदना वा नैसर्गिक निवड करीत नाही तर बुध्दी, स्वतःची प्रेरणा आणि तर्कशुध्दता ही करते हाच त्या दोन संघर्षातील फरक आहे.''[3]

रॉय म्हणतात,''जहाल मानवतावादाने, आधुनिक संस्कृतीचा पाया घालणाऱ्या लोकांची परंपरा आपल्या हाती घेतली आहे. ही परंपरा या पृथ्वीतलावरील परमेश्वर व त्याचे हस्तक यांच्या जुलुमाविरूध्द माणसाने पुकारलेल्या लढाईची परंपरा आहे.''[4] त्यांनी पुढे म्हटले आहे की हे काही नवीन तत्वज्ञान

नव्हे. कारण प्रबोधनाचे विचारवंत आणि अठराव्या शतकातील मानवतावादी तत्वज्ञ यांच्यापासून त्याने स्फूर्ती घेतली आहे. त्या काळात या लोकाना मानवाचे निसर्गाशी नाते जुळविण्याची शक्यता नव्हती. आधुनिक विज्ञानाने ती अडचण दूर केली आहे. मानवतावादाला मुळाशी जाता येणे शक्य झाले आहे आणि त्यामुळेच रॉय यांनी आपल्या मानवतावादाला जहाल मानवतावाद असे नाव दिले आहे.

जहाल मानवतावादापावेतोचा प्रवास हा काही सोपा प्रवास नव्हता. आपल्या कम्युनिस्ट अवस्थेतील जीवनात रॉय यांनी ज्या कल्पना खऱ्या म्हणून स्वीकारल्या होत्या त्यांच्यापैकी बऱ्याच कल्पनांचा त्यांना त्याग करावा लागला. हा प्रवास हे कल्पनांच्या क्षेत्रातील एक साहसच होते. मार्गावर काही पथदर्शक चिन्हे नव्हती किंवा पथदर्शकही नव्हते. कम्युनिझमबद्दल भ्रमनिरास झालेले अनेक कम्युनिस्ट त्यांचा त्याग केल्यावर धर्माकडे वळले; अनेक जण प्रागतिकांकडे किंवा राष्ट्रवादाकडे परत झुकले होते. तेच मार्ग रॉय यांच्यापुढेही उभे होते. पण मागे वळण्याऐवजी त्यांनी आगेकूच करण्याचा निर्णय घेतला. ते कम्युनिझमच्या पलीकडे गेले आणि त्यांनी जहाल मानवतावादाचा शोध घेतला. स्वतःपुरता रॉय यांनी हा प्रवास फार लवकर पुरा केला असता. आवश्यक ती साधनसामुग्री त्यांनी आधीच गोळा केली होती. उदाहरणार्थ नैसर्गिक व सामाजिक शास्त्रांचा आणि तत्वज्ञानाचा अभ्यास. पण त्यांना आपल्याबरोबर सहकारी, मित्र आणि हितचिंतक यांचे एक मोठे वर्तुळ न्यावयाचे होते. त्यापैकी बहुसंख्य लोकांना आपल्याबरोबर नेण्यात त्यांना यश मिळाले; अगदी थोडे विचलित झाले. परंतु या सर्व लोकांची तयारी करण्यासाठी दीर्घ चर्चा करावी लागली. शांतपणे युक्तिवाद करावा लागला. या चर्चेसाठी देहरादून येथे दोन उन्हाळ्याचे वर्ग भरवावे लागले, केवढा तरी पत्रव्यवहार करावा लागला आणि जाहीर सभांतून अनेक भाषणे द्यावी लागली.

रॉय हे राजकारणातून निवृत्त होऊन, डेहराडून येथे निवांतपणे रहावयाला आणि आपला सारा वेळ सर्वस्वी लेखन वाचनात घालविण्याला उत्सुक होते. पण राजकारणाने त्याना सोडले नाही. 1946 साली रॅडिकल पक्षाने प्रांतिक विधानसभांच्या निवडणुका लढविण्याचे ठरविले. निवडणुकीच्या मोहिमेचे मार्गदर्शन करण्याचे व त्या मोहिमेत जीव ओतण्याचे मुख्य कार्य रॉय यांनाच करावे लागले. त्याच वर्षी सत्ता प्रदान करण्याच्या बाबतीत गंभीर चर्चा व वादविवाद सुरु झाला. रॉय यांचा असा आग्रह होता की सत्ता जनतेच्या हाती देण्यात यावी, जनतेचे प्रतिनिधी आपण आहोत असे म्हणणाऱ्या राजकीय पक्षांच्या हाती नव्हे. ब्रिटिश सरकारला आपला दृष्टिकोन पटवून देण्यात त्याना यश आले नाही. त्याचप्रमाणे जनतेची आवश्यक ती संघटना तयार करण्यातही ते यशस्वी झाले नाहीत. ऑगस्ट 1947 मध्ये भारताला स्वातंत्र्य

मिळाल्यानंतर आणि डिसेंबर 1948 मध्ये रॅडिकल पक्षाचे विसर्जन झाल्यानंतर राजकारणाकडे पाठ फिरविण्याच्या दृष्टीने इष्ट ती वेळ आल्यासारखे दिसू लागले. पण तरी सुध्दा रॉय याना राजकारणातून सर्वस्वी निवृत्त होता येईना. वेळावेळी राजकीय प्रश्न उठत आणि रॉय यांना त्याबद्दलची आपली भूमिका स्पष्ट करावी लागे. खरे सांगावयाचे तर पक्षाचे विसर्जन झाल्यानंतर रॉय यांचा वेळ आणि शक्ती अधिक मोठ्या प्रमाणात राजकीय प्रश्नांच्या बाबतीत मार्गदर्शन करण्याकडे खर्च होऊ लागली. कारण त्यांचा सल्ला अधिक निरपेक्ष आणि वस्तुनिष्ठ होईल असेच लोकाना वाटू लागले. रॉय यांनी त्या सुमारास राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रश्नांवर आपल्या साप्ताहिकात ज्याचे नाव त्यानी आता 'रॅडिकल ह्यूमॅनिस्ट' असे ठेवले होते, त्यात अनेक लेख लिहिले. त्यात इंग्लिश व अमेरिकन नियतकालिकातही त्यांनी अनेक लेख लिहिले. त्यांच्या लेखनाला देशात आणि परदेशात मोठीच मानमान्यता प्राप्त झाली.

त्या काळातील त्यांच्या राजकीय विचारमंथनातील दोन मुद्यांचा खास उल्लेख करणे आवश्यक आहे. एक म्हणजे पक्ष निरपेक्ष राजकारणाबद्दलचा त्यांचा आग्रह. रॉय यानी असे म्हटले की राजकीय पक्ष सत्तेसाठी चाललेल्या स्पर्धेत हिरीरीने भाग घेतात कारण त्यांची अशी श्रध्दा आहे की सत्ता काबीज केल्याशिवाय काहीही साध्य होणार नाही. सत्ता काबीज करणे हा साहजिकच त्यांचा मग एकमेव हेतू होतो आणि तो हेतू साध्य करण्यासाठी ते वाटेल त्या मार्गांचा आश्रय घेतात. रॉय यांनी लिहिले ''राजकीय मागासलेपणा आणि एकंदर अज्ञान यांच्या वातावरणात या पध्दतीचा कसा दुरूपयोग होऊ शकतो हे अनुभवाने सिध्द झाले आहे. त्याचप्रमाणे एका विशिष्ट राजकीय पक्षाशी संबंध असल्यामुळे वादग्रस्त चारित्र्याच्या व्यक्ती सार्वजनिक क्षेत्रातील सन्मानपदे कशी प्राप्त करु शकतात हेही स्पष्ट दिसून आले आहे. राजकीय पक्ष, बौध्दिक गुण वा नैतिक चारित्र्य असलेल्या लोकाना प्राधान्य आणि श्रेष्ठत्व देत नाहीत तर जे लोक सत्ता काबीज करण्याच्या दृष्टीने सर्वात जास्त सहाय्यभूत होऊ शकतील त्यांनाच देतात. त्याचा परिणाम असा होतो की पक्ष अनेक वेळा, सत्तेसाठी सत्ता हाती घेऊ पाहणाऱ्या किंवा आर्थिक फायद्यासाठी झटणाऱ्या व्यक्तींच्या महत्वाकांक्षा साध्य करण्याचेच उद्दिष्ट पुरे करीत असलेला आढळून येतात.''[5]

या चर्चेमुळे रॉय हे सत्तेच्या केंद्रीकरणाच्या प्रश्नाचा विचार करण्याकडे वळले आणि हे केंद्रीकरण राजकीय तशीच आर्थिक सत्ता विकेंद्रित करणाऱ्या नव्या समाज व्यवस्थेतून कसे टाळता येईल याचा विचार करु लागले. आपला अखेरचा निष्कर्ष जाहीर करताना रॉय यानी लिहिले: ''राजकारणाचा

हेतू जोवर सत्ता काबीज करणे हा राहील तोवर राजकीय पक्षांशिवाय आपले चालणार नाही. पण आपल्याला सत्ता काबीज करावयाची नसेल तर आपण पक्षांशिवाय राजकारण चालवू शकू. पक्षाच्या गैरहजेरीत सत्तेचे प्रतिनिधित्व करण्याची पध्दती नष्ट होईल आणि सत्तेच्या केंद्रीकरणाला राज्यघटनात्मक आधारही राहणार नाही. त्यानंतर आपल्याला असा एक एकसुरी समाज निर्माण करता येईल की जो एक स्वतंत्र समाज असेल आणि जो व्यक्तीचे स्वातंत्र्य हिरावून घेणार नाही आणि ज्यात समाजाचे स्वातंत्र्य, कल्याण आणि उत्कर्ष हाच त्या समाजाचे घटक असलेल्या व्यक्तिगत स्त्रीपुरुषांच्या स्वातंत्र्य, कल्याण आणि उत्कर्षाशी सुसंगत राहील.''[6]

दुसरा मुद्दा म्हणजे क्रांतीच्या नव्या मार्गाची जी सूचना रॉय यांनी केली तो होय. 1946 साली डेहराडून येथे भरविण्यात आलेल्या अभ्यास मंडळाच्या बैठकीत त्यांनी या सूचनेवर चर्चा केली. रॉय यानी या क्रांतीला ''संमतीने वा मनोमीलनातून येणारी क्रांती'' असे नाव दिले. क्रांती ही आवश्यक आहे असे रॉय यांनी सांगितले. पण ते म्हणाले की आधुनिक राजवटींच्या हाती असलेल्या प्रचंड लष्करी सामर्थ्यामुळे जुन्या शस्त्राधारी बंडातून ती घडवून आणणे शक्य होणार नाही. म्हणून एखाद्या नव्या मार्गाचा शोध घेतलाच पाहिजे. हा नवा मार्ग म्हणजे अनुनयाचा, मने वळविण्याचा मार्ग होय. हा मार्ग परिणामकारक ठरेल, असे रॉय यानी ठासून सांगितले. कारण क्रांती करण्याची इच्छा आता फक्त कामगार वर्गापुरतीच मर्यादित राहिलेली नाही. ती सबंध जनतेची इच्छा झालेली आहे. या नव्या विचारसरणीतून जहाल मानवतावादाच्या राजकीय आचाराचा उगम झाला. हा आचार म्हणजे शहरातून आणि खेड्यातून जनसमित्या स्थापन करणे हा होय. या जनसमित्या जनसामान्यांना जीवन सुलभ करण्याच्या दृष्टीने मदत करतील त्याचप्रमाणे त्यांच्या हक्कांसाठी झगडतील. कालांतराने या जनसमित्या विकेंद्रित सत्तेची खरीखुरी साधने बनतील. या अभ्यास मंडळात जी चर्चा झाली तिच्यातून जहाल मानवतावादाचा पाया घातला गेला. रॉय यांनी या चर्चेत जे मोलाचे विचार प्रगट केले ते 'न्यू ओरिएन्टेशन' या नावाने कलकत्त्याच्या रेनेसान्स पब्लिशर्सने प्रसिध्द केलेल्या पुस्तकात एकत्रित करण्यात आले आहेत.

जहाल मानवतावादाने रॉय यांना गांधीजी व त्यांच्या विचार पठडीतील लोक यांच्याजवळ आणले. त्या दोघांमध्ये आता बरेच साम्य निर्माण झाले होते. दोघांनीही माणूस हा सामाजिक विचार व कृती यांचा केंद्रबिंदू मानला होता. दोघेही राजकीय व आर्थिक सत्तेच्या विकेंद्रीकरणाचे पुरस्कर्ते झाले होते. आणि दोघांनीही राजकारण पवित्र करण्यासाठी पक्षविहीन लोकशाहीचा मार्ग अनुसरण्याची सूचना केली होती. त्यांच्यामध्ये अर्थातच काही मूलभूत

मतभेद होते. रॉय हे भौतिकवादी तसेच तर्कशुध्द आचार विचारांचे पुरस्कर्ते होते. त्याच्याउलट गांधीजी आधिदैविकवादी होते. तसेच ते 'आतल्या आवाजा'वर अधिक भर देणारे होते. तथापि त्यामुळे व्यावहारिक उद्दिष्टांसाठी एकत्र येण्याच्या मार्गात काही अडथळे आले नाहीत. पुढील काळात त्या प्रकारच्या समान कार्यक्रमात जहाल मानवतावादी व गांधीजींचे सर्वोदयी कार्यकर्ते यांचे सहकार्य झाले.

रॉय यांच्या गांधीजीबद्दलच्या कल्पनेतही गांधीजींच्या जीवनातील अखेरच्या दोन वर्षाच्या काळात फार मोठा फरक घडून आला होता. रॉय हे गांधीजींचे सततचे टीकाकार होते. पण स्वातंत्र्य प्राप्तीनंतर सत्तेपासून ते जे दूर झाले आणि हिंदु-मुसलमान प्रश्न सोडविण्यासाठी त्यानी बंगालमध्ये 'एकला चलो रे' या पध्दतीची जी यात्रा काढली त्या दोन्ही गोष्टींनी रॉय यांच्यावर फार मोठा प्रभाव टाकला. त्यांना जाणीव झाली की गांधीजी ही एक फार मोठी नैतिक शक्ती आहे. गांधीजींच्या खुनाची वार्ता आली तेव्हा रॉय याना जबरदस्त धक्का बसला. कलकत्ता येथील एक सभेत ते बोलत असतानाच ही वार्ता आली. त्यानंतर त्यांना सभा चालू ठेवता येईना. गांधीजींना छोटीशी श्रध्दांजली अर्पण करून त्यांनी ही सभा बरखास्त केली. त्यानंतर इंडिपेंडट इंडियाच्या स्तंभातून त्यानी गांधीजींच्या गुणवर्णनपर लेख लिहून त्यांच्या कार्याबद्दल त्यांना धन्यवाद दिले. या लेखात त्यांनी साध्यामुळे साधनांचे समर्थन होऊ शकत नाही या गांधीजींच्या संदेशाची लोकांना आठवण करून दिली.

या काळात रॉय यानी बरीच पुस्तके लिहिली आणि प्रकाशित केली. त्यातील सर्वात महत्वाचे पुस्तक म्हणजे 'रीझन, रोमॉन्टिरिझम ॲन्ड रेव्होल्यूशन' हा त्यांचा द्विखंडी ग्रंथ होय. त्या ग्रंथाचा पहिला खंड 1953 च्या फेब्रुवारीमध्ये प्रकाशित झाला. रॉय यांच्या विचाराचे ते सार सर्वस्व होय आणि त्यातूनच जहाल मानवतावादी तत्वज्ञानाचा तात्विक पाया घातला गेला आहे. रॉय यांच्या 'रेव्होल्यूशन ॲन्ड काउंटर रेव्होल्यूशन इन चायना' या चीनवरील ग्रंथाची पहिली इंग्रजी आवृत्ती 1946 साली प्रसिध्द झाली. रॉय यानी तो ग्रंथ 1930 साली लिहिला होता. पण अनेक कारणांमुळे तो अप्रकाशित राहिला. चीनमधील क्रांतीची कहाणी अद्यावत् करण्यासाठी पूर्वीच्या ग्रंथात आणखी एक दोन प्रकरणे घालण्यात आली. 'रशियन रेव्होल्यूशन' हा रॉय यांचा ग्रंथ 1947 साली प्रकाशित करण्यात आला. युध्दकाळात रॉय यानी जे लेख लिहिले तेच मुख्यता या ग्रंथात समाविष्ट करण्यात आले आहेत. या काळातच रॉय यानी आपल्या आठवणी लिहिल्या. त्या सर्व एकत्रित करण्यात येऊन 1946 साली 'एम्. एन्. रॉयज मेमुआंज' या नावाने त्या पुस्तकरुपाने प्रसिध्द करण्यात आल्या. या वर्षात इतरही काही राजकीय

पुस्तके प्रसिध्द करण्यात आली.

या साहित्यिक कार्यात आणि जहाल मानवतावादी आंदोलनाचा विकास करण्याच्या कार्यात रॉय हे इतके मग्न झाले की बरीच वर्षे त्यांना विश्रांती अशी मिळालीच नाही. अखेरीस 1952 सालच्या जूनमध्ये ते ही विश्रांती घेण्यासाठी मसूरीला गेले. एलन रॉयही त्यांच्याबरोबर होत्या. दररोज सकाळी ते दोघेही दीर्घ सहलीसाठी बाहेर पडत असत. 11 जून रोजी नेहमीप्रमाणे ते सकाळच्या सहलीवर निघाले. तेथून उंच सखल मार्गाने ते परत येत असताना एका उंचवट्यावर रॉय याना ठेच लागली आणि ते सुमारे पन्नास फूट खाली गडगडत गेले. त्यांना गंभीर स्वरूपाच्या दुखापती झाल्या. आणि बरेच आठवडे ते अंथरूणावर खिळून राहिले. तज्ज्ञ वैद्यकीय इलाज आणि पत्नीने केलेली शुश्रूषा यामुळे त्यांना हळूहळू आराम वाटला. त्यानंतर ते परत डेहराडूनला गेले आणि आपल्या कार्याचा व्याप हाती घ्यावयाला ते सज्ज झाले. परंतु आकस्मिकपणे रक्तवाहिन्यात अडथळा येऊन त्यांच्या प्रकृतीत होणाऱ्या सुधारणेला प्रतिबंध बसला. त्या वर्षाच्या अखेरीस त्यातूनही ते सुधारले आणि 'रॅडिकल ह्यूमॅनिस्ट' साठी ते लेखन करू लागले. आपला पत्रव्यवहारही त्यानी सुरू केला. 1953 सालच्या मे महिन्यात त्यांना इतके बरे वाटू लागले की वैद्यकीय उपचारासाठी आणि भाषणांची जी आमंत्रणे त्याना आली होती ती पुरी करण्यासाठी अमेरिकेला भेट देण्याचाही विचार करू लागले. तथापि ऑगस्ट महिन्यात पुन्हा एकदा सेरिब्रल थ्रॉम्बोसिसचा त्यांना झटका आला. सहकारी, सहाय्यक आणि भारत व परदेशातील त्यांचे मित्र यांच्यावर हा आघातच होता. युरोप व अमेरिकेतील त्यांचे मित्र उत्कंठेने त्यांच्या भेटीची वाट पहात होते. त्यापैकी काही कम्युनिस्ट आंदोलनातील त्यांचे जुने सहकारी होते. ते त्यांना भेटावयाला व जागतिक प्रश्नांवरील त्यांचे अनुभव व प्रतिक्रिया यांच्याविषयी तुलनात्मक चिकित्सा करावयाला उत्सुक होते. पण ते घडून येणार नव्हते. दिवसेंदिवस रॉय यांच्या आजाराचे प्रमाण वाढतच गेले. अखेरीस 25 जानेवारी 1954 रोजी रात्री भारताचा प्रजासत्ताक दिन सुरू होण्यापूर्वी थोडे आधी या प्राणघातक आजाराने रॉय यांच्यावर कायमची झडप घातली आणि रॉय अनंतात विलीन झाले.

रॉय यांच्या निधनाबद्दल असंख्य लोकांनी भारतातील आणि अनेक देशातील त्यांच्या मित्रांनी दुखवटा व्यक्त केला. 13 मोहिनी रोडवर दुखवट्याच्या संदेशांचा वर्षाव झाला. अनेक सभा झाल्या आणि अनेक प्रकारे रॉय यांना श्रध्दांजली अर्पण करण्यात आली. रॉय यांच्या निधनामुळे देशातील एक बुध्दिशाली धीरोदात्त व्यक्तित्व त्याचप्रमाणे स्वातंत्र्यासाठी कळकळीने लढणारा एक वीरपुरूष नाहीसा झाला होता. रॉय यांनी आपल्या जीवनाच्या सुरूवातीला

स्वातंत्र्याचा जो शोध सुरू केला तो यापुढे त्यांच्या ग्रंथसंपत्तीतून, त्याप्रमाणे आपल्या पाठीमागे त्यानी जीवन सर्वस्व अर्पण करणाऱ्या धैर्यशाली सहकाऱ्यांचा जो संच गोळा केला त्यांच्या सहाय्याने चिरकाल चालू राहिला पाहिजे.

## टीपा

1. रॉय, एम.एन. *न्यू ओरिएन्टेशन,* रेनेसांस पब्लिशर्स, कलकत्ता 1946 पृ. 24.
2. रॉय, एम. एन. *रॅडिकल ह्यूमॅनिझम,* इस्टर्न इकॉनॉमिस्ट पॅम्फलेटस्, नवी दिल्ली 1952. पृ. 16.
3. रॉय, एम.एन. *सायन्स ॲन्ड फिलॉसॉफी,* रेनेसांस पब्लिशर्स, कलकत्ता, 1947 पृ. 23.
4. *कित्ता,* पृ.23.
5. *रॅडिकल ह्यूमॅनिझम,* पृ.31.
6. *कित्ता,* पृ. 44.

# जीवनपट

| | |
|---|---|
| 1887 मार्च | जन्म |
| 1906 | क्रांतिकारक चळवळीत पदार्पण |
| 1907 डिसेंबर | चिंग्रीपोटा रेल्वे स्टेशनवरील दरोडा |
| 1910 एप्रिल | नेत्रा दरोडा |
| 1910 | हावडा कटाच्या खटल्यात अटक |
| 1911 ते 1913 | क्रांतिकारक गट संघटित करण्यासाठी भारतात प्रवास; जतीन मुखर्जी यांच्या नेतृत्वाखाली ब्रिटिश राजवटीचे उच्चाटन करण्यासाठी तयार झालेल्या कटात सहभाग. |
| 1914 ऑगस्ट | पहिल्या महायुध्दाची सुरूवात |
| 1915 फेब्रुवारी | गार्डन रीच दरोडा |
| 1915 एप्रिल | बाटाव्हियास प्रयाण |
| 1915 | जतीन मुखर्जी यांचे निधन |
| 1915 ऑगस्ट ते 1916 जून | शस्त्रास्त्रांच्या शोधार्थ इंडोनेशिया मलाया, चीन, जपान यात्रा |
| 1916 जून | बर्लिनमार्गे अमेरिकेला प्रयाण |
| 1916 जून 14 | सानफ्रान्सिस्कोला भेट आणि मानवेंद्रनाथ रॉय असे नामकरण |
| 1916 ऑगस्ट | न्यूयॉर्कमध्ये आगमन |
| 1917 जून | अमेरिकेचे युध्दात पदार्पण |
| 1917 जून | हिंदू-जर्मन कटानिमित्त न्यूयॉर्क येथे अटक |
| 1917 जुलै | मेक्सिकोला पलायन |
| 1918 डिसेंबर | मेक्सिकन सोशालिस्ट परिषद |
| 1919 वसंत ऋतू | बोरोदिनची भेट |
| 1919 ऑक्टोबर | मेक्सिकन समाजवादी पक्षाचे कम्युनिस्ट पक्षात रूपांतर - रशियाबाहेरचा पहिला कम्युनिस्ट पक्ष |
| 1919 नोव्हेंबर | दुसऱ्या कॉमिन्टर्न काँग्रेससाठी मेक्सिकोहून प्रयाण |
| 1919 डिसेंबर | बर्लिनमध्ये प्रवेश |
| 1920 एप्रिल | मॉस्कोत आगमन |

| | |
|---|---|
| 1920 मे किंवा जून | लेनिनशी पहिली भेट |
| 1920 जुलै-ऑगस्ट | दुसरी कॉमिन्टर्न काँग्रेस |
| 1920 ऑगस्ट | ताश्कंदची यात्रा |
| 1920 ऑक्टोबर | इंडिया हाऊस व लष्करी शाळा यांची स्थापना |
| 1920 ऑक्टोबर 17 | ताश्कंदमध्ये कम्युनिस्ट पक्षाची स्थापना |
| 1921 अखेर | 'इंडिया इन ट्रान्झिशन'-रशियन आवृत्ती इंग्रजी आवृत्ती 1922 च्या मध्याला |
| 1922 मे | व्हॅनगार्डचे प्रकाशन |
| 1924 | कानपूर कम्युनिस्ट कटाचा खटला |
| 1927 जानेवारी ते ऑगस्ट | चीन यात्रा |
| 1928 एप्रिल | मॉस्कोहून विमानाने प्रयाण |
| 1928 सप्टेंबर | सहावी कॉमिन्टर्न काँग्रेस |
| 1929 मार्च | मीरत कम्युनिस्ट कटाचा खटला |
| 1929 डिसेंबर | कॉमिन्टर्नमधून उचाटन |
| 1930 डिसेंबर | गुप्तपणे भारतात प्रवेश |
| 1931 मार्च | कराची काँग्रेस अधिवेशनात भाग |
| 1931 जुलै | सात महिन्याच्या भूमिगत संचारानंतर मुंबईत अटक. |
| 1931 ऑगस्ट ते डिसेंबर | कानपूर खटल्याची सुनावणी |
| 1932 जानेवारी | बारा वर्षांची शिक्षा - अपीलात सहा वर्षे सक्तमजुरी |
| 1933 जानेवारी | हिटलरचा सत्तेवर उदय |
| 1936 नोव्हेंबर | डेहराडून तुरूंगातून सुटका |
| 1936 डिसेंबर | फैझपूर काँग्रेस अधिवेशनात भाग |
| 1937 एप्रिल | 'इंडिपेंडंट इंडिया'चे प्रकाशन |
| 1938 जून | लीग ऑफ रॅडिकल काँग्रेसमेन'ची स्थापना |
| 1939 सप्टेंबर | दुसऱ्या महायुध्दाची सुरूवात |
| 1940 ऑक्टोबर | युध्दप्रश्नावर काँग्रेसचा राजीनामा |
| 1940 डिसेंबर | 'रॅडिकल डेमोक्रॅटिक' पक्षाची स्थापना |
| 1944 एप्रिल | 'पीपल्स प्लॅन'चे प्रकाशन |
| 1945 | 'कॉन्स्टिट्यूशन ऑफ इंडिया' चे प्रकाशन |
| 1948 डिसेंबर | चवथ्या परिषदेत 'रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षा'च्या पक्षाचे विसर्जन |
| 1952 जुलै | मसूरी येथे अपघात व दीर्घ आजार |
| 1954 जानेवारी | देहरादून येथे निधन |

## महत्वाची ग्रंथसंपदा

1. रिझन, रोमँटिसिझम अँड रिव्होल्यूशन खंड I-II
2. मटिरियालिझम, ॲन आउटलाइन ऑफ हिस्ट्री ऑफ सायंटिफिक थॉट
3. न्यू ओरिएंटेशन
4. न्यू ह्यूमॅनिझम
5. बियाँड कम्युनिझम
6. रिव्होल्यूशन अँड काउंटर रिव्होल्यूशन इन चायना
7. माय एक्स्पिरिअन्सिस इन चायना
8. एशियन रिव्होल्यूशन
9. अवर डिफरन्सेस
10. इंडिया इन ट्रान्झिशन
11. फ्यूचर ऑफ इंडियन पॉलिटिक्स
12. अवर प्रॉब्लेम्स
13. लेटर्स टू कॉंग्रेस सोशालिस्ट पार्टी
14. इंडिया अँड वॉर
15. नॅशनॅलिझम, ॲन अँटिक्वेटेड कल्ट
16. नॅशनल गव्हर्मेंट ऑर पीपल्स गव्हर्मेंट
17. आय. एन. ए. अँड ऑगस्ट रिव्होल्यूशन
18. जवाहरलाल नेहरू
19. पॉलिटिक्स, पॉवर अँड पार्टीज
20. हिस्टॉरिकल रोल ऑफ इस्लाम
21. फ्रॉम सॅव्हेजरी टू सिव्हिलायझेशन
22. सायन्स अँड सुपरस्टिशन
23. कॉन्स्टिट्यूशन ऑफ इंडिया
24. लेटर्स फ्रॉम जेल
25. मेमुआंज
26. मेन आय मेट

# सूची

